॥ श्री ॥

# विविधज्ञानविस्तार

आणि

## महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका.

वर्ष ५१ ] दिसेंबर १९२०. [ अंक १२.

### अनुक्रमणिका.



वा. व. ३ रुपये. ] १३-१-१९२१ [ फुटकळ अंक ६ आणे.




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत

अनुक्रमणिका




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे.

ख्यातकीर्त ग्रंथसंग्राहक, संशोधक, संपादक आणि समीक्षक डॉ. स. गं. मालशे ह्यांच्या संग्रहातील जुन्या नियतकालिकांचे काही अंक संगणकीकरण करून अभ्यासकांना उपलब्ध व्हावेत ह्यासाठी त्यांच्या कन्या डॉ. सुषमा पौडवाल ह्यांनी राज्य मराठी विकास संस्थेला उपलब्ध करून दिले आहेत.

ह्या ग्रंथांच्या/ नियतकालिकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना आपण खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१) सदर ग्रंथांच्या/ नियतकालिकांच्या पीडीएफ प्रती ह्या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२) सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३) पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्थेची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४) आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी ह्या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून ह्या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. ह्यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था ह्यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत

अनुक्रमणिका

## आश्रयदात्यांस विनंती.

हा अंक हातीं देऊन आम्ही आमच्या आश्रयदात्यांच्या ऋणांतून या वर्षापुरते मोकळे झालों आहों. गेल्या जुलैच्या अंकांत सूचना दिल्याप्रमाणें येत्या सालीं ग्राहकांकडून ट. ह. पुरते अवघे ४ जास्त घेण्याचें ठरविलें आहे. ज्यांच्याकडून पुढील सालची वर्गणी म्हणजे ट. ह. सह रु. ३८४ जानेवारी अखेरीचे आंत येणार नाहीं, त्यांचेकडे पुढील महिन्याचा-म्हणजे जानेवारीचा अंक दरसालच्या वहिवाटीप्रमाणें व्ही. पी. नें पाठवून, १९२१ सालची वर्गणी वसूल करण्यांत येईल. तरी आश्रयदात्यांनीं कृपा करून व्ही. पी. चा स्वीकार करावा अशी विनंती आहे. तसें करण्यास ज्यांस सवड नसेल, त्यांनीं त्याप्रमाणें आम्हांस आगाऊ कळवावें. म्हणजे व्ही. पी. चा खर्च फुकट जाणार नाहीं. विस्तारानें आजपर्यंत यथाशक्ति केलेल्या कामगिरीकडे लक्ष देऊन आमचे प्रस्तुतचे आश्रयदाते यापुढेंही त्याजवर पूर्ववत् प्रेम ठेवतील आणि आपल्या मित्रमंडळीपैकीं कांहींना तरी त्याचे ग्राहक बनविण्याचा प्रयत्न करितील, अशी आशा आहे.

जानेवारीचा अंक त्या महिन्याच्या अखेरच्या आठवड्यांत पोष्टांत पडेल.

**म्यानेजर.**

## पोंच आणि अभिप्राय.

[ १९२ पृष्ठावरून पुढें चालू. ]

**७. पद्माकरास पत्रें.** रा. विश्वनाथ नारायण लाड, नासीक, यांनीं पुण्यास कॉलेजांत गेलेल्या आपल्या भावास लिहिलेल्या सहा उपदेशपर पत्रांचा या २२ पृष्टांत समावेश केला आहे. यांतील विचार कॉलेजमध्यें असणाऱ्या इतर विद्यार्थ्यांसही मननीय आणि आचरणीय आहेत. किं. २ आणे.

**८. तिलकांजलि.** हें शोकरसप्रधान खंडकाव्य रा. लक्ष्मणशास्त्री लेले यांनीं कै. टिळकांच्या शोचनीय निधनप्रसंगाला अनुलक्षून लिहिलें आहे. कवि या नात्यानें शास्त्रीबोवांनीं आजपर्यंत संपादन केलेल्या लौकिकाला तें साजेसें उतरलें असून तिलकप्रेमी लोकांच्या हृदयाला पूर्णपणें चटका लाविण्याचें सामर्थ्य त्याच्यांत ओतप्रोत भरलें आहे, यांत शंका नाहीं. शास्त्रीबुवांची प्रस्तुतची कृति अत्यंत सरस झाली आहे; मात्र स्वतःच्या कृतीला स्वतःच मुबलकशा टीपा देणें हें आपल्या कृतीला आपणच दुर्बोध ठरविण्यासारखें होत असतें, अशी आमची समजूत आहे. पुस्तक नवीन किताबखाना, बुधवारचौक, पुणें, येथें मिळतें. किं. ८४ आणे.

**९. तिलकस्तवराज.** प्रस्तुत काव्यमय पुस्तकही रा. टिळकांच्या विरहावस्थेंतच जन्मलें असून त्याचे कर्ते वे. शा. सं. भालचंद्र शंकर देवस्थळी हे आहेत. वे शा. देवस्थळी यांची कविता मराठी वाचकांस पूर्ण परिचयाची असून तिलकस्तवराजही त्यांच्या यशाला भूषणप्रदच झाला आहे. तिलकप्रेमी लोकांना अवश्य संग्राह्य आहे. कठिण शब्दांचे अर्थ समजण्यास भरपूर टीपा आहेत. पुस्तक के. बी. ढवळे, माधवबाग-मुंबई, यांजकडे विकत मिळेल. पुस्तकाच्या आकाराच्या मानानें ८६ आणे किंमत थोडीशी जास्त वाटते.

**१०. मनोहरलीला.** हें ऐतिहासिक खंडकाव्य रा. दु. आ. तिवारी, शेंदुर्णीकर यांनीं लिहिलें. प्रस्तुत काव्याचें कथानक रजपूतकालीन असून त्यांत पातिव्रत्याच्या संरक्षणासाठीं लीलेनें दाखविलेलें अलोट शक्तिवैभव फारच बहारीनें वर्णन केलें आहे. काव्य एकंदरींत प्रसन्न आहे.

**११. प्रसन्न-राधा.** प्रस्तुत आनंदपर्यवसायी काव्यही वरील कवीचेंच अपत्य होय. यांत एका काल्पनिक कथानकाची उभारणी केली असून आत्यंतिक प्रेमाचा विजय शेवटीं कसा होतो, याचें शब्दचित्र बऱ्याच समाधानकारक रीतीनें रंगविलेलें वाचकांस दिसेल.

किं. प्रत्येकीं ८३ आणे. थोडी जास्तच आहे. हीं दोनी पुस्तकें धनंजय प्रेसचे मालक रा. द. गो. सडेकर, खानापूर-बेलगांव यांजकडे विकत मिळतील.

**१२.** The Pandyas and the Date of Kalidas. 'भांडारकर रिचर्स-इन्स्टीट्यूट'नें भरविलेल्या कॉन्फरन्स पुढें वाचलेल्या या निबंधांत रा. रा.




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका.
वर्ष ८ ] त्रैमासिक. [ अंक ४

# जैनमतोत्पत्तिमीमांसा.

——: :——

( लेखक–कै. शिवराम एकनाथ भारदे. )

भवबीजांकुरजलदा रागाद्याः क्षयमुपागता यस्य ॥ ब्रह्मा वा विष्णुर्वा हरो जिनो वा नमस्तस्मै ॥

हेमाचार्य.

जैनमतोत्पत्तिमीमांसा म्हणजे या भरतखंडांत जैनमताचा उद्भव कसा झाला याचें विवेचन. येथें जैनमत असें मीं म्हटलें आहे, याचें कारण असें कीं, सांप्रत जरी बौद्ध व जैन यांना निराळे धर्म म्हणण्याचा प्रघात पडला आहे, तरी हे दोन्ही धर्म हिंदुधर्मांतील पाखंडी मतें आहेत, अशी प्राचीन लोकांची समजूत होती. सर्व-दर्शनसंग्रहकारांनीं यांना नास्तिकदर्शनें म्हटलें आहे. ज्ञानेश्वरांनींही या पाखंडी मतांचा उल्लेख ज्ञानेश्वरींत केला आहे. तात्त्विक दृष्ट्या बौद्ध व जैन मतांत जरी फरक असला तरी सामान्य लोक त्यांना एकच समजत होते. गेल्या खाने-सुमारीपर्यंत बौद्ध व जैन या दोन वर्गांची गणना एकाच सदराखालीं होत होती. म्हणजे आपण बौद्धांहून भिन्न आहों, अशी खुद्द जैनांना देखील खबर नव्हती. पाश्चिमात्य पंडितांनीं जैनमताचा ऊहापोह सुरू केल्यानंतर व त्यांचे लेख इंग्रजी मासिकांतून इकडील इंग्रजी-भाषाभिज्ञ जैनांनीं वाचल्यानंतर आपल्या धर्माच्या भिन्नत्वाविषयीं त्यांस अभिमान उत्पन्न झाला, व गेल्या खाने-सुमारीच्या वेळीं सरकारास अर्ज करून त्यांनीं आपली गणना निराळ्या सदराखालीं करून घेतली. गेल्या खानेसुमारीवरून पाहतां त्यांची एकंदर संख्या साडेबारा लाख आहे. ही संख्या हिंदुस्थानांतील तीस कोटी प्रजेच्या मानानें अगदींच अल्प आहे खरी; परंतु जैन-समाज धनकनकसमृद्ध असल्यामुळें व त्यांचा दान-धर्म मोठा असल्यामुळें तो समाज फार वजन-दार समजला गेला आहे. असो.

जैनमताच्या उत्पत्तीसंबंधानें पाश्चात्यपंडित-मंडळांत तीन मतें आहेत. कोणी म्हणतात, बौद्धधर्माचा ऱ्हास झाल्यानंतर बौद्धधर्म व ब्राह्मणधर्म यांच्या मिश्रणापासून जैनमताचा उद्भव झाला. लेथ्ब्रिज, मौंटस्टुअर्ट एल्फिन्स्टन हे या मताचे होत. कित्येकांच्या मतें बौद्धधर्मांत दुफळी होऊन जैनमत निघालें. प्रो. विल्सन, वेबर, लासन, बार्थ हे पंडित या मताचे होत. डॉ. बुल्हर व प्रो. जाकोबी यांच्या मतें जैनमत बौद्धधर्माच्या पूर्वींचें आहे. या आपल्या मतास ते असें प्रमाण देतात कीं, महावग्ग व महा-परिणिब्भाणसुत्त या बौद्ध ग्रंथांत, चोविसावा जैन तीर्थंकर महावीर हा गौतमबुद्धाशीं समका-लीन होता, एवढेंच नव्हे, तर त्याचा व बुद्धाचा संवाद झाला व बुद्धानें त्याच्या मताचें खंडन केलें, असा उल्लेख आहे. अर्थात् जैनांचे तेवीस




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत

तीर्थंकर गौतमबुद्धाच्या पूर्वीचे असले पाहिजेत. हें प्रमाण फारसें बलवत्तर नाहीं, असें इतर पंडितांचें म्हणणें आहे; व स्वतः त्यांनाही ही गोष्ट कबूल आहे. प्रो. जाकोबी, ज्यांना हा अपूर्व शोध लावल्याचें श्रेय देण्यांत येत आहे, तेच आपल्या लेखाच्या शेवटीं असें म्हणततातः—

"All these aruments are open to one fatal objection, *viz.* that they are taken from the Jain literature which was reduced to writing so late as the fifth century A. D."

[ तथापि हीं सर्व विधानें एका घातक आक्षेपास पात्र आहेत. ख्रिस्ती शकाच्या पांचव्या शतकांत लिहिल्या गेलेल्या जैन वाङ्मयांतून तीं उचललीं आहेत, हाच तो आक्षेप होय. ]

भगवान् बुद्धासंबंधाच्या ज्या अनेक दंतकथा पालीभाषेंत लिहिल्या आहेत, त्यांपैकीं एका दंतकथेंत असा उल्लेख आहे कीं, एके प्रसंगीं भगवान् बुद्धांचा व सहा पाखंडी मतप्रवर्तकांचा वाद झाला.त्या सहा जणांत ज्ञातिपुत्र निर्ग्रंथ या नांवाचा एक होता. जैनांच्या मतें ज्ञातिपुत्र हें महावीराचें उपनांव होतें, तेव्हां बुद्धाशीं वाद करणारा महावीरच असला पाहिजे. महावीराचें उपनांव जर ज्ञातिपुत्र होतें तर कलापसूत्रांत जें जैन ग्रंथकारांनीं महावीराचें सविस्तर चरित्र दिलें आहे त्यांत त्याचा उल्लेख कां केला नाहीं ? बुद्धग्रंथकारांना सुद्धां ज्ञातिपुत्र हा जैन होता असा उल्लेख करण्यास काय हरकत होती ? दुसरें असें कीं, बुद्धाशीं वाद करून पराजित झालेल्या ज्ञातिपुत्रास आपल्या तीर्थंकरांत प्रविष्ट करण्यांत जैनांस तरी पुरुषार्थ कां वाटावा ? सारांश, हें सारेंच मोठें गूढ आहे. हें केव्हां, कोण, कसें उकलील न उकलो.

प्रथम जैन या शब्दाच्या उत्पत्तीविषयीं विचार करूं. 'जयति इति जिनः,' म्हणजे रागद्वेषादि ज्यानें जिंकिले तो जिन, असें स्पष्टीकरण जैनग्रंथांत केलेलें आहे. जि-जिंकणें या धातूस न प्रत्यय लागून जिन शब्द सिद्ध झाला, असें शाकटायन म्हणतो. शाकटायन पाणिनीच्या व यास्काच्या पूर्वी होऊन गेला. अर्थात् जैनमत पाणिनीच्या फार पूर्वी प्रचलित होतें असें शाकटायनाच्या उणादि सूत्रावरून सिद्ध होऊं पाहतें. परंतु जर जिन हा शब्द शाकटायनानें आपल्या सूत्रांत सिद्ध केला तर पाणिनि आदिकरून नंतरच्या व्याकरणकारांनीं तो वगळण्याचें कारण काय ? 'जि' धातूस प्रत्यय लागून जिष्णु, जित्वर हे साधलेले शब्द व्याकरणकारांनीं दिलेले आहेत. जिन हा शब्द ज्या अर्थी पाणिनीनें दिलेला नाहीं, त्या अर्थी पाणिनीच्या कालीं तो प्रचारांत नसला पाहिजे. पाणिनि हा फार चौकस व्याकरणकार होता त्याच्या नजरेंतून हा शब्द जाईल हें संभवत नाहीं. तेव्हां शाकटायनाच्या सूत्रांत 'जि' हा धातु मागाहून कोणीं तरी घुसडला असावा, असा बळकट संशय येतो. शाकटायनाच्या वेळीं जर **जिन** शब्द रूढ होता तर संस्कृत कवींनीं त्याचा अनादर करण्याचें कारण काय ? इंद्रियजयाच्या प्रशंसापर अनेक श्लोक भगवद्गीतेंत आहेत; त्यांपैकीं एकांतही जिन हा शब्द योजिलेला नाहीं. वास्तविक पाहतां गीतेंत वर्णिलेला स्थितप्रज्ञ व जिन या दोन्ही शब्दांचा अर्थ सारखाच आहे.जयतीति जिनः, हा विग्रह तरी साऱ्या जैन ग्रंथकारांस मान्य आहे असें दिसत नाहीं. श्रीमच्छङ्कराचार्यांस एक जैन भेटला, तो त्यांना म्हणालाः 'जीतिपदवाच्यस्य जीवस्य नेतिपदेन न पुनर्भवस्तस्माज्जन्मशून्या वयं जैनाः।' अर्थात् जि म्हणजे जीव असा त्यानें अर्थ केला. सारांश, जिन शब्दाच्या व्युत्पत्तीविषयीं एकवाक्यता नाहीं. माझ्या मतें जिन हा शब्द मूळचा संस्कृत नाहींच, तो *Zeno* या शब्दाचें संस्कृत रूप होय. जैनमत ग्रीस देशांत


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
अनुक्रमणिका

एके काळीं प्रचलित असलेल्या Stoic संप्रदायापासून निघालें अशी माझी कल्पना आहे. तिच्या समर्थनार्थ मी जीं प्रमाणें मांडणार आहें, तीं कितपत साधार आहेत हें ठरविणें विद्वानांकडे आहे.

पहिलें प्रमाण, जिन हा शब्दच होय. प्राचीन काळीं ग्रीस देशांत झेनो या नांवाचा एक विख्यात तत्त्वज्ञ होऊन गेला. त्यानें एक नवीनच पंथ स्थापिला. त्या पंथासंबंधानें ग्रीक ग्रंथांत येणेंप्रमाणें उल्लेख आहे:-

" Zeno of Citium—Born 342 B. C. and Died 270 B. C. aged 72 years. About 300 B. C. he came forward as a teacher. His pupils were at first called Zenonians but afterwards Stoics. Universally honoured for his character he voluntarily put an end to his life.

The School is scarcely to be considered a product of purely Greek intellect but rather as the first fruits of that inter-action between West and East which followed the conquests of Alexander the Great."

[सिटियमचा झेनो, हा ख्रिस्ती शकाच्या पूर्वीं ३४२ व्या वर्षीं जन्मला व ७२ वर्षांच्या आयुष्यक्रमानंतर ख्रिस्ती शकापूर्वीं २७० व्या वर्षीं मरण पावला. ख्रिस्ती शकापूर्वीं सुमारें तीनशें वर्षांच्या सुमारास तो शिक्षक या नात्यानें प्रख्यातीस चढला. प्रथम त्याच्या शिष्यवर्गाला लोक झेनोनियन या नांवानें संबोधीत असत. पण कालान्तरानें त्यांस स्टोइक ही संज्ञा प्राप्त झाली. झेनोच्या चारित्र्याबद्दल त्याची सार्वत्रिक प्रशंसा होत असे. व त्यानें स्वयमेव आत्महत्या करून जीवनयात्रा संपविली.

हा संप्रदाय निव्वळ ग्रीक लोकांच्या बुद्धिमत्तेचो फलनिष्पत्ति आहे, असें म्हणणें निराधार ठरतें. शिकंदराच्या पूर्वेकडील मोहिमेनंतर पूर्व आणि पश्चिम या दोन दिग्प्रदेशांत जो विचारविनिमय होऊं लागला त्याच्या आरंभींचें फळ हा संप्रदाय आहे, असें मानणें उचित दिसतें.]

जिन शब्दाच्या व्युत्पत्तीसंबंधानें वर जे आक्षेप घेतले आहेत ते जर बरोबर असतील, तर जिन हा शब्द झेनो या शब्दापासून व जैन झेनोनियन शब्दापासून प्रचारांत आला, असा तर्क करण्यास अडचण नाहीं. शिकंदराच्या स्वारीनंतर ग्रीक व हिंदु व्यापाऱ्यांचें जें निकट दळणवळण सुरू झालें, त्याच्यामुळें ग्रीक तत्त्वज्ञांनीं इकडचें तत्त्वज्ञान अंशतः ग्रीस देशांत नेलें व तिकडचें तत्त्वज्ञान या देशांत आणिलें. आमच्या षड्दर्शनांपैकीं सांख्यदर्शन अत्यंत प्राचीन होय.. या दर्शनांतील कांहीं तत्त्वें जैनमतांत सामील केलेलीं आहेत. उदाहरणार्थ, जड हें नित्य आहे, जग अनादि आहे, इत्यादि तत्त्वें सांख्यशास्त्रांतून ग्रीस देशांत जाऊन तिकडून अंशतः भिन्न होऊन इकडे आलीं. ज्या अर्थीं झेनोची गणना तीर्थंकरांत केलेली नाहीं व ज्या अर्थीं त्याचें चरित्र जैन ग्रंथांत उपलब्ध नाहीं, त्या अर्थीं तो हिंदुस्थानांत आला नव्हता हें सिद्ध होतें. त्याचें राहण्याचें गांव ' सिटियम; ' यावरून चैत्यम् हा शब्द संस्कृतांत आलासा दिसतो. ' चैत्यं जिनमन्दिरम् ' असा कोश आहे.

जैन धर्मांतील जिन शब्दाच्या खालच्या दर्जाचा शब्द 'अर्हत्' होय. हा शब्द अर्ह् =पात्र असण या धातपासून निघालेला असून, त्याचा अर्थ पूज्य असा कांहीं जैन ग्रंथकार करितात. याच शब्दाचें रूप ' अरिहन्ता ' असेंही कांहीं जन ग्रंथांत आढळतें. अरिहन्ता म्हणजे षड्रिपूंचें हनन करणारा. सारांश, या शब्दाच्या व्युत्पत्तीसंबंधानें देखील जैन ग्रंथकारांची एकवाक्यता नाहीं. अह् या धातूचा अर्थ, स्वतंत्रपणें, पूज्य असणें असा होतो, असें मला वाटत नाहीं. उदाहरणार्थः—

" कथं भीष्ममहं संख्ये द्रोणं च मधूसूदन ॥
इषुभिः प्रतियोत्स्यामि पूजार्हावरिसूदन ॥ अ. २।४
तस्मान्नार्हा वयं हंतुं धार्तराष्ट्रान् स्वबांधवान् ॥


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

'अर्ह्' धातु स्वतंत्रपणें पूज्यार्थक असता तर पूजार्ह अशी द्विरुक्ति योजण्याचें कारण नव्हतें. धर्मशास्त्रांत तर हा धातु सर्वत्र योजिलेला आहे. दंडमर्हति, प्रायश्चित्तमर्हति, असे प्रयोग अनेक आहेत. तेव्हां जिन शब्दाप्रमाणेंच अर्हत् हा शब्दही मूळचा संस्कृत दिसत नाहीं. झेनोचा पट्टशिष्य Aratus नांवाचा होता. तोच जैनांचा अर्हत् दिसतो. ज्या अर्थीं याचें चरित्र जैन ग्रंथकारांनीं दिलेलें आहे व जैन मतास याच्याच नांवावरून 'अर्हत्–दर्शन' असें नांव प्राप्त झालें आहे, त्या अर्थीं हिंदुस्थानांत हा आला होता, असें दिसतें. तथापि याची गणना तीर्थंकरांत नसल्यामुळें जैनधर्मप्रसार करण्याच्या कामीं यास फारसें यश आलेंसें दिसत नाहीं.

ऋषभ हा जैनांचा पहिला तीर्थंकर होय. यानेंच जैनमत भरतखंडांत प्रथम स्थापिलें असें जैन लोक म्हणतात. ऋषभ या नांवाचे ऋषि व राजे हिंदुलोकांच्या पुराणांत अनेक आहेत. ऋषभदेव तीर्थंकराचा उल्लेख जरी भागवतपुराणांत आहे तरी तो मूळचा संस्कृत शब्द दिसत नाहीं. झेनोच्या शिष्यपरंपरेपैकीं ख्रिसिपस नांवाचा एक महाविद्वान् स्टोइक पंडित होता, तोच हा ऋषभ दिसतो. केवळ नामसादृश्यावरच मीं ही कल्पनेची इमारत रचली आहे, असा सकृत्दर्शनीं कोणाचा समज होण्याचा संभव आहे; परंतु पुढील मुद्द्यांचा विचार केला म्हणजे त्याची बरीच खातरी होईल. निदान या दोन्ही मतांचा कांहीं तरी निकट संबंध असावा, असा संशय तरी त्याच्या मनास वाटूं लागेल. या ख्रिसिपस् संबंधानें ग्रीक ग्रंथांत असें लिहिलें आहेः—

"Chrysippus of Soli, who assimilated, developed and systematised the doctrines bequeathed to him by Zeno, was regarded as the second founder of the Stoic Sect. By his successful labours as a teacher and his very numerous works he not only rendered very great services for the outward spread of Stoicism but brought its system of teaching to perfection. He lived from 281–208 B. C."

[ झीनोपासून मिळालेल्या शिकवणीचा संग्रह करून तिला पद्धतशीर स्वरूप आणणारा व तिची अभिवृद्धि करणारा पुरुष ख्रिसिपस हा होय. तो सोली शहरचा रहिवासी होता. त्यालाच स्टोइक संप्रदायाचा द्वितीय संस्थापक समजतात. शिक्षक या नात्यानें त्यानें बजावलेली यशस्वी कामगिरी व त्यानें लिहिलेले अनेक ग्रंथ या दोन कारणांमुळें बाह्यतः स्टोइक संप्रदायाच्या मतप्रसाराचें पुष्कळ काम झालें, इतकेंच नव्हे तर त्यानें संप्रदायाचे सिद्धान्त पूर्णावस्थेस नेऊन पोंचविले. तो ख्रिस्तीशकापूर्वी २८१ पासून २०८ वर्षांपर्यंत जगला.]

आतां जिन, अर्हत् व ऋषभ या तीन संस्कृत नांवाचे झेनो, आरेटस व ख्रिसिपस या स्टोइक आचार्यांच्या नांवांशीं किती साम्य आहे, हें दाखविल्यावर दुसऱ्या तीर्थंकरांच्या नांवांशीं कांहीं स्टोइक आचार्यांचीं नांवें किती तंतोतंत जुळतात हें दाखवितों.

७ **सुपार्श्व**—Tersius Flacus

संस्कृतांत पार्श्व म्हणजे बाजू. पार्श्वनाथ म्हणजे बाजूचा नाथ. याचा अर्थ कांहीं होत नाहीं. पार्श्व हें केवळ Persias चें संस्कृत रूप होय.

११ **श्रेयांस**–Chæremon.

श्रेयस् हा शुद्ध शब्द होय. अंस किंवा अंश. अंस=खांदा. अंश=भाग. संधिनियमाप्रमाणें श्रेयोंश असें रूप व्हावयास पाहिजे. श्रेयस्=श्रेष्ठ खांदा किंवा भाग,- म्हणजे कांहीं अर्थ नाहीं. मूळचा शब्द संस्कृत नाहीं, म्हणून ही व्यर्थ ओढाताण आहे.


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

अनुक्रमणिका

१२ **वासुपूज्य, वसुपाद्य**–Posidonius.

वसु=संपत्ति. वसु आहे पूज्य ज्याला. हें विपरीत. वसुपाद्य–अर्थ कांहीं नाहीं.

१७ **कुंथु**–Cleanthus.

कुंथु–कुंथ्=दुःख भोगणें या धातूपासून हा शब्द निघाला असें म्हणावें तर तीर्थंकर म्हणजे सुखदुःखापासून अलिप्त असणारा. हा शब्दही मुळचा संस्कृत नव्हे.

१८ **अरनाथ**–Arius Dydimus.

संस्कृतांत 'अर' म्हणजे चाकाचा अरा. अरि असें रूप मूळच्या शब्दास अधिक जवळ, पण अर्थ विपरीत म्हणून अरिनाथ असें रूप झालें नाहीं.

२१ **नमि**–Numenius.

नम्=वांकविणें. अर्थ नीटसा जुळत नाहीं. नम्र.

२२ **अरिष्टनेमी** Aristo of Chios.

मूळचा शब्द अरिष्ट. पण अर्थ विपरीत-म्हणून त्यास नेमी शब्द जोडला. अरिष्टाचें नियमन करणारा तो अरिष्टनेमी.

२३ **पार्श्व**—Pertæus.

२४ **महावीर**—Sphærus.

याशिवाय कांहीं तीर्थंकरांचीं नांवें मूळच्या नांवाचीं रूपांतरें होत. उदाहरणार्थ —

१० **शीतल**–Altalus

१४ **अनंत**–Autoninus.

१५ **धर्म**–Germinus.

२० **सुव्रत**–Euphrates.

वर दिलेलीं सर्व नांवें केवळ यदृच्छेनें जुळलीं असें म्हणणें योग्य होणार नाहीं.

आतां जैनमताचें स्टोइकमताशीं किती विलक्षण साम्य आहे, याचा विचार करूं:—

( १ ) जैनांचे वीस तीर्थंकर हे जिन म्हणजे Vanquishers of passions आहेत. अर्थात् त्यांनीं इंद्रियजय केलेला होता. स्टोइक मताचाही मुख्य कटाक्ष इंद्रियजयावरच आहे. स्टोइकमताविषयीं झेलर येणेंप्रमाणें म्हणतोः—

"Stoic virtue was essentially a battle with the passions. Zeno taught that man should be free from passions, unmoved by joy or grief and submit to the laws by which all things are governed."

[ स्टोइक संप्रदायांत मनोविकारांशीं सामना देणें हाच मोठा सद्गुण समजला जातो. झीनो असें सांगत असे कीं, मनोविकारांचा पगडा माणसावर बसतां कामा नये. त्याचें मन हर्षविषादानें उचंबळून अथवा गोंधळून जाणें योग्य नाहीं. आणि मनुष्यानें ज्या कायद्यान्वयें जगाची रहाटी चालते त्याच कायद्याप्रमाणें वागलें पाहिजे. ]

प्रत्येक धर्मांत कालगतीनें भिन्न भिन्न संप्रदाय उत्पन्न होतात. त्यांपैकीं कांहीं प्रवृत्तिमार्गी असतात, कांहीं निवृत्तिमार्गी असतात. हा प्रकार सर्व धर्मांत कमी अधिक प्रमाणानें आढळून येतो. ख्रिस्ती धर्मांतील जेजुइट पंथ व मुसलमानी धर्मांतील सुफी पंथ हे अशाच प्रकारचे संप्रदाय होत. ग्रीस देशांत एपिक्यूरसनें जो संप्रदाय स्थापिला तो प्रवृत्तिमार्गी होय. 'Eat, drink and be merry'–खावें, प्यावें, आणि मजा मारावी, हें या संप्रदायाचें मुख्य तत्त्व होय. हिंदुस्थानांतील वल्लभीसंप्रदाय, ज्यास पुष्टिसंप्रदाय असेंही म्हणतात, त्याचें एपिक्युरस-संप्रदायाशीं पुष्कळच साम्य आहे; त्या संप्रदायाचें प्राबल्य कमी करण्याकरितांच झेनोनें स्टोइकपंथ स्थापिला.

( २ ) जैनमतांत सम्यग्ज्ञान, सम्यग्दर्शन, व सम्यग् चारित्र्य या तीन गोष्टींस इतकें महत्त्व आहे कीं, या तिहींच्या समुच्चयास 'रत्नत्रयी' असें नांव जैनांनीं दिलें आहे.

'रत्नत्रयपदवेदनीयतया प्रसिद्धं सम्यग्दर्शनादि त्रितयमर्हत्प्रवचनसारे परमागमसारे प्ररूपितं सम्यग्दर्शनज्ञानचारित्राणि मोक्षमार्ग इति.'



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

स्टोइकपंथांत सुद्धां या तीनच प्रकारच्या तत्त्वविद्येस प्राधान्य दिलें आहे. यास प्रमाणः-

"The three parts of philosophy which the Stoics enumerated were not always taught in the same order, and different opinions prevailed as to their relative value. Zeno and Chrysippus, however, began with logic, passed from this to physics, and ended with ethics.

So absolutely is the rare and priceless wisdom for which we strive identical with virtue itself that the three main divisions of philosophy current at the time and accepted by Zeno-Logic, Physics and Ethics-are defined as the most generic and comprehensive virtues."

[ स्टोइक संप्रदायाच्या तत्त्वमीमांसेचे एकंदर तीन भाग आहेत, पण ते सर्वदा यथानुक्रमानें शिकविले जात नसत व त्यांच्या क्रमाबद्दल व त्यांच्या महत्त्वाबद्दल बरेंच दुमत होतें. झीनो व क्रिसिपस प्रारंभीं तर्कशास्त्राला घेऊन नंतर पदार्थविज्ञान व शेवटीं नीतिशास्त्र शिकवीत असत. ]

बिनमोल व दुष्प्राप्य व्यवहारचातुर्यासाठीं मनुष्य खटपट करीत असतो. या चातुर्याची सद्गुणाशीं एकरूपता झाल्यामुळें त्या काळांत प्रचलित असलेल्या व झेनोनें स्वीकारलेल्या तत्त्वज्ञानाचे, न्याय, पदार्थविज्ञान व नीति हे तीन विभाग अत्यंत व्यापक आणि सामान्य स्वरूपाचे आहेत, अशी व्याख्या केळी जात असते.]

स्टोइक संप्रदायांत ज्या त्रिविध तत्त्वज्ञानास Rare and priceless wisdoms म्हटलेलें आहे त्यास जैनमतांत 'रत्नत्रयी' ही संज्ञा प्राप्त झाली आहे, हें यथार्थच आहे.

सम्यग्ज्ञान. Right knowleage. Logic न्यायशास्त्र. सम्यग्दर्शन. Right perception Physics. पदार्थविज्ञानशास्त्र. सम्यक्चारित्र्य Right Conduct. Ethics नीतिशास्त्र.

( ३ ) जैनमताप्रमाणें पदार्थांचे जीव व अजीव असे दोन विभाग आहेत. सप्त चैषां विवसनानां पदार्थाः संमताः संक्षेपतस्तु द्वावेव पदार्थौ जीवाजीवाख्यौ." स्टोइक मतालाही हाच विभाग संमत आहे.

"The general concept under which all the categories come, is considered by Chrysippus 'something'. This something is again divided into Being and Not-being."

[ क्रिसिपस यानें 'वस्तु' या सामान्यकल्पनेंत ज्ञानाच्या सर्व शाखांचा अंतर्भाव केला आहे. या 'वस्तूचे' सजीव आणि निर्जीव असे त्यानें दोन भेद केले आहेत. ]

या विभागाला अनुसरून जे शब्द जैनशास्त्रकारांनीं योजिले आहेत ते शब्द म्हणजे अस्तिकाय, पुद्गल व त्रस,हे मूळचे ग्रीक शब्द असावेत असा माझा समज आहे. अस्तिकाय, Oosia,पुद्गल Poiotis व त्रस Ti हे शब्द कोणत्याही हिंदुदर्शनांत आढळण्यांत येत नाहींत.

( ४ ) जीव व आत्मा या दोहोंचें भिन्नत्व जैन मानीत नाहींत. त्यांच्या मतें आत्मा सर्व शरीर व्यापून राहतो. मुंगीच्या शरीरांत तो अणु असतो व हत्तीच्या शरीरांत तो मोठा असतो.

"शरीरपरिमाणो हि जीव इत्यार्हता मन्यंते." स्टोइक-मतही असेंच आहेः—

"In order to explain the fact that the soul permeated the body through its whole extent the Stoics denied the impenetrability of bodies. They maintained that one body could penetrate another in all its parts without being one material with it."

[ आत्मा शरीराच्या अणुरेणूंत संचार करतो, या सिद्धान्ताच्या स्पष्टीकरणार्थ स्टोइक संप्रदाय शरीराच्या अप्रवेशनीयतेची कल्पना खरी धरीत नाहीं.तो संप्रदाय असें सांगतो कीं, एक पदार्थ दुसऱ्या पदार्थांत समरस न होतांही मिसळणें शक्य आहे. ]

( ५ ) " अहिंसा परमो धर्मः । मा हन्यात् सर्वाणि भूतानि । "



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

हें जें जनधर्मांतील प्रधान तत्त्व, ज्या तत्त्वावरून जैनधर्मास दयामयधर्म असें नांव प्राप्त झालें आहे,व ज्या उदात्त तत्त्वामुळें आपला धर्म सर्व धर्मांत श्रेष्ठ आहे असें जैन समजतात,त्याचा उगम स्टोइक पंथांतील 'Life according to nature' या तत्त्वापासून आहे. पुढील उतारा पाहा: —

"Their supreme principle is in general the life according to nature. The most universal impulse of nature is in every creature the impulse to self-preservation. Epicurus had declared pleasure to be the end of all instinctive activity; while the Stoics combated his position and sought to prove that not pleasure but self-preservation is really sought."

[निसर्गाच्या नियमानुसार जीवितक्रम असावा हा त्यांचा श्रेष्ठतम सिद्धान्त आहे. स्वसंरक्षणाची जाणीव सर्व प्राणिमात्रांत सर्वत्र प्रामुख्यानें दृष्टीस पडते. एपिक्यूरस यानें अंतःस्फूर्तीचीं सर्व कर्में सुखप्राप्त्यर्थ घडतात असें तत्त्व प्रतिपादन केलें आहे. पण हें तत्त्व स्टोइक पंथाला मान्य नाहीं. सर्व कर्माचें आत्मसंरक्षण हेंच आद्य प्राप्तव्य आहे, असें स्टोइक पंथाचें मत आहे.]

प्राणिमात्राची नैसर्गिक प्रवृत्ति सुखाकडे आहे, हा एपिक्यूरसचा सिद्धांत. हा खोडून काढण्यासाठीं स्टोइक आचार्यांनीं असें सिद्ध केलें कीं, प्राणिमात्राची नैसर्गिक प्रवृत्ति सुखाकडे नसून आत्मसंरक्षणाकडे आहे. याच अर्थाचा पुढील श्लोक पाहा: —

प्राणानां परिरक्षणाय सततं सर्वाः क्रियाः प्राणिनाम्
प्राणेभ्योऽभ्यधिकं समस्तजगतां नास्त्येव किंचित्प्रियम्
पुण्यं तस्य न शक्यते गणयितुं यः पूर्णकारुण्यवान्
प्राणानामभयं ददाति सुकृती तेषामहिंसाव्रतः ॥

जैनमूर्तीचा नग्नपणा व जैनांचा दिगंबरपणा या गोष्टी Life according to nature तत्त्वाचाच परिणाम होत.

जैनांस ईश्वराचें अस्तित्व मुळींच कबूल नाहीं असें जरी म्हणतां येत नाहीं, तरी आपल्या चोवीस तीर्थंकरास ते देवापेक्षांही श्रेष्ठ मानितात. हिंदूंच्या कांहीं देवतांस ते पूज्य मानितात खरे–तसे ते कधीं पूज्य मानूं लागले हें निश्चयानें सांगतां येत नाहीं–परंतु अशा सर्व देवता तीर्थंकरांच्या खालच्या पायरीच्या आहेत, असें ते मानितात. या मताचें मूळ देखील स्टोइक संप्रदायाच्या Doctrine of the wise man= प्राज्ञपुरुषवाद, यापासून आहे. तें मत असें:–

"Nothing presents more forcibly the pitch of their moral idealism than the Doctrine of the Wise Man. All mankind falls into two classes, the wise or virtuous, the unwise or wicked. Now the wise man is drawn as perfect. All he does is right; all his opinions are true; he alone is free, rich, beautiful, skilled to govern, capable of giving or receiving a benefit; and his happiness, since length of time cannot increase it, falls in nothing short of that of Zeus."

[त्यांच्या नैतिक ध्येयवादाचा प्रभाव प्राज्ञपुरुषवादानें जितका उत्कृष्टपणें मनावर ठसतो तितका दुसऱ्या कोणत्याही मुद्द्यानें ठसत नाहीं. त्या वादानुसार सर्व मानवजातीचे दोन वर्ग ठरतात. एक शहाण्या नीतिमंतांचा व दुसरा मूर्ख दुरात्म्यांचा. शहाणा मनुष्य पूर्णप्रज्ञ गणला जातो. त्याचीं सर्व कर्में पुण्यशील व सर्व मतें सत्य असतात. तोच एकटा स्वतंत्र, श्रीमंत, सुंदर, नियमनकार्यांत कुशल, व दुसऱ्यावर उपकार करण्यास व दुसऱ्याचा उपकार घेण्यास समर्थ असतो. त्याच्या सुखाची कालाच्या गतीबरोबर वृद्धि होणारी नसल्यामुळें परमेश्वराच्या आनंदमयत्वाशीं त्याची तुलना करावयास हरकत नाहीं.]

ग्रीकलोकांचा श्रेष्ठ देव झूस. त्याच्या तोडीचा प्राज्ञ पुरुष होतो, असें स्टोइकपंथाच्या अनुयायांचें स्पष्ट मत होतें.

(७) जैनलोकांत प्रायोपवेशन–पज्जुसन–म्हणजे उपवास, यांचें केवढें महत्त्व आहे हें


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

सांगावयास नको. जो जितके जास्त दिवस उपास करील तो तितका पूज्य असें ते मानितात. कधीं कधीं या उपवासाचें पर्यवसान प्राणोत्क्रमणांत होतें, असा अनुभव आहे. कांहीं वर्षांपूर्वी एका उपवास करणाऱ्या जैन स्त्रीचा दंभपरिस्फोट कसा झाला हें पुष्कळांनीं वाचलें असेल. हें उपवासाचें बंड सुद्धां जैनांनीं स्टोइक-संप्रदायापासून घेतलें आहे.

"In order to secure for men their independence under any circumstances, they permitted voluntary departure from life. This is not only a refuge from extreme distress, but they saw in it the noblest preservation of moral freedom, a step by which a man proved that he regarded life among things indifferent and which he is justified in taking whenever circumstances make it appear to be more in accordance with nature that he should leave his earthly life than remain in it. Zeno, Cleanthus, Eratosthenes, Antipater and many other Stoics ended their lives in this manner."

[ कोणत्याही परिस्थितींत मनुष्याला आपलें जन्मसिद्ध स्वातंत्र्य कायम राखतां यावें म्हणून जगाच्या सामान्य रहाटीपासून भिन्न तऱ्हेनें वागण्याची त्यांनीं मुभा ठेवलेली होती. दुःसह दुःखापासून मुक्तता होण्याचा तो एक मार्ग आहे असें ते समजत होते. या साधनानें नैतिक स्वतंत्र्याचें उदात्त संरक्षण घडतें असा त्यांचा समज होता. या साधनाच्या द्वारें मनुष्याला जीविताची देखील फिकिर बाळगण्याचें कारण नाहीं असें ते दाखवीत असत. निसर्गाशीं तादात्म्य पावण्याची जेव्हां परिस्थिति व शक्यता दिसेल तेव्हां या साधनाचा अवलंब करावा असें त्यांचें समर्थन आहे. योग्य वेळीं प्रस्तुत साधनाच्या जोरावर माणसानें ऐहिक जीविताला खुशाल राम राम ठोकावा असें ते समजत, आणि झीनो, क्लीआन्थस, इराटोस्थेनीस, ॲंटिपेटर, या व दुसऱ्या अनेक स्टोइक पंथाच्या अभिमान्यांनीं आपल्या जीविताचा प्रस्तुत साधनानें अंत करून घेतला आहे.]

(८) जैनमतांतील विशेष वादाचा विषय म्हटला म्हणजे स्याद्वाद व नयवाद होय. याच वादाचें खंडन करून शंकराचार्यांनीं जैनमताचें अप्रयोजकत्व सिद्ध केलें आहे. पदार्थांचें सदसत्व जसें आमच्या स्याद्वादानें सिद्ध केलें जातें तसें दुसऱ्या कोणत्याही तर्कशास्त्रोक्त पद्धतीनें केलें जात नाहीं, असा जैनपंडितांचा मोठा बाणा आहे. न्यायसूत्रकार गौतमानें ज्या अर्थी स्याद्वादाचा विचार केलेला नाहीं, त्या अर्थी हा वाद गौतमानंतरचा आहे, असें म्हणावें लागतें. स्याद्वादाचें स्वरूप थोडक्यांत सांगणें म्हणजे असें:—

"सर्वत्र चेमं सप्तभङ्गीनयं नाम न्यायमवतारयन्ति। स्यादस्ति, स्यान्नास्ति, स्यादस्ति च नास्ति च, स्यादवक्तव्यः स्यादस्ति चावक्तव्यश्च, स्यान्नास्ति चावक्तव्यश्च, स्यादस्ति च नास्तिचावक्तव्यश्च। एवमेवैकत्वनित्यद्वादिष्वपीमं सप्तभङ्गीनयं योजयन्ति। अत्राचक्ष्महे नायमभ्युपगमो युक्त इति। कुतः। एकस्मिन्नसंभवात्। नह्येकस्मिन्धर्मिणि युगपत्सदसत्वादिविरुद्धधर्मसमावेशः। संभवति शीतोष्णवत्। य एते सप्तपदार्था निर्धारिता एतावन्त एवंरूपाश्चेति ते तथैव वा स्युर्नैव वा तथा स्युः।"

"In their treatment of conclusions, they gave such prominence to the hypothetical and disjunctive that they only were to be regarded as conclusions in the proper sense. But the scientific value of this Stoic logic is very slight and if in details it enters here and there into more precise enquiry, the pedantic external formalism, which Chrysippus especially introduced into logic, could not be of advantage to the general condition of the Science."

[सिद्धान्तांच्या मीमांसेंत ते सांकेतिक आणि विघटनात्मक पद्धतीला प्राधान्य देऊन त्याच पद्धतीचे सिद्धान्त ते खरे धरून चालत. शास्त्रीय दृष्ट्या स्टोइक पंथाच्या न्यायमीमांसेची योग्यता विशेष नाहीं.


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
अनुक्रमणिका

मधून मधून ते सिद्धान्ताच्या तपशिलांत खोल शिरून सत्याचा ठाव काढण्याच्या प्रयत्नांत आढळतात. परंतु दिखाऊ पांडित्याचे जे नियम क्रिसिपसनें न्यायशास्त्रांत घुसडले, ते त्या शास्त्राच्या व्यापक स्वरूपांत कोणत्याही प्रकारें भर टाकीत नाहींत. ]

## ९. नयवाद.

"Their corrections and fancied improvements of the Aristotelian logic are mostly useless and pedantic. Judgment, they defined as a complete idea capable of expression in language and they distinguish it from other enunciations. From simple judgments, they proceeded to compound judgments and declared the hypothetical syllogism to be the normal type of reason of which the categorical syllogism is an abbreviation. Aristotle made ten categories, all co-ordinate to serve as heads of predication, under which to collect distinct scraps of information respecting a subject. For this the Stoics substituted four Summa Genera, all subordinate, so that each in turn is more precisely determined by the next. They are something or being determined as—

(1) Substance or subject matter. प्रतिपाद्य-विषय

(2) Essential quality-substance qualified, याचा अनन्य साधारण गुण.

(3) Mode or chance attribute-qualified substance त्याचे नैमित्तिक गुण

(4) A certain condition—विशिष्ट स्थिति अथवा

(5) Relation or relative mode. विशिष्ट संबंध

[ त्यांनीं अरिस्टाटल कृत न्यायशास्त्रामध्यें ज्या दुरुस्त्या व काल्पनिक सुधारणा केल्या आहेत त्या प्रायः निरुपयोगी व पोकळ पांडित्याच्या दर्शक आहेत. निर्णय म्हणजे एक संपूर्ण कल्पना भाषेंत व्यक्त करणारा शब्दसमूह असे ते म्हणतात, व त्याची इतर व्याख्यांशीं फारखत करितात. साध्या निर्णयापासून निघून ते मिश्र निर्णयाकडे वळतात व त्यांचे मत असें आहे कीं, सांकेतिक अनुमानपद्धति हीच तर्कविचारांतली सामान्य दिशा असून वर्गवाचक अनुमानपद्धति सांकेतिक अनुमानपद्धतीचा संक्षेप आहे अरिस्टाटलनें तर्काचे दहा भाग पाडले आहेत. प्रत्येक विषयासंबंधीं जी माहिती मिळेल तिच्यांतील सामान्य व असामान्य तत्त्वांचें परीक्षण करून त्याला त्या त्या वर्गांत घालण्याचा अरिस्टाटलच्या तर्कशास्त्राचा नियम आहे पण यांनीं सर्व विषयांचें चार वर्ग पाडले आहेत. त्यांचें स्वरूप वर दर्शविल्याप्रमाणें आहे. ]

याप्रमाणें जैनमताचें व ' स्टोइक पंथा 'च्या मताचें साम्य दिसून येतें.




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

# सवाई माधवराव आणि दुर्गाबाई.

जनीं सांगतां ऐकतां जन्म गेला । परी वादवेवाद तैसाचि ठेला ।
उठे संशयो वाद हा दंभधारी । तुटे वाद संवाद तो हीतकारी ॥ ११२ ॥

रामदास.

१. इतिहासलेखन केव्हांही निर्विकार मनोवृत्तीनें झालें पाहिजे. त्यांत कोणत्याही प्रकारचे पूर्वग्रह असतां कामा नये. किंबहुना स्वतःची वैयक्तिक माहितीसुद्धां कित्येक वेळां निरुपयोगी ठरते. मराठ्यांचा इतिहास लिहावयाचा असल्यास अलीकडे जी नूतन साधनोपलब्धि झालेली आहे तिचाच उपयोग करणें अधिक इष्ट व विहित आहे. विशेषतः अस्सल कागदपत्र जितके अधिक मिळतील तितके पाहून त्यावरून इतिहासाचें लेखन झाल्यास तें अधिक उपयुक्त होईल. कित्येक इतिहाससंशोधक आपल्या पुस्तकांत आरंभीं प्रस्तावना अगर पुढील पत्रांचा सारांश देऊन मग अस्सल पत्रें छापीत असतात. परंतु, त्या पत्रांतील मजकुराचा व पूर्वीच्या प्रस्तावनेचा अगर ग्रंथकाराच्या सारांशाचा संबंध नसतो. असा प्रकार पुष्कळ ठिकाणीं आढळत असल्यामुळें नवीन इतिहासलेखकानें ती प्रस्तावना अगर तो सारांश सुद्धां लक्ष्यांत न घेतां इतिहासलेखनास प्रारंभ करणें अधिक उचित आहे. इतिहासलेखनसमयीं राजवाडे-खऱ्यांचे * प्रास्ताविक लेख सुद्धां लक्ष्यांत घ्यावयाचे नाहींत, हें सांगितलें म्हणजे डफ वगैरेंचे स्वतंत्र इतिहास मुळींच आधारास धरावयाचे नाहींत, हें निराळें सांगण्याची आवश्यकताच नाहीं. भारतइतिहाससंशोधक मंडळाचे अहवाल व संमेलनवृत्तें, खऱ्यांचे ऐतिहासिक लेखसंग्रह, राजवाड्यांचीं खंडें, काव्येतिहाससंग्रहापैकीं पत्रें-यादींचा भाग, भारतवर्ष, शकावल्या, फॉरेस्टचा निवडक लेखसंग्रह, वाडकृत रोजनिश्या, इतिहास-संग्रह, इतिहास व ऐतिहासिक, बखरी व दंतकथा इत्यादि ज्या ज्या ठिकाणीं अस्सल माहिती प्रसिद्ध झाली असेल ती सर्व प्रत्यक्ष पाहून, त्याची न्यायाधीशी बाण्यानें, सारासार विचारानें व दूरदृष्टीनें एकवाक्यता व निवड करून कोणत्याही प्रकारच्या पूर्वग्रहानें व वकिली डावपेंचानें रहित अशा मनोवृत्तीनें जर मराठ्यांचा इतिहास लिहिला गेला तर तो पाहिजे आहे. प्रसिद्ध झालेल्या मित्तींच्या तारखासुद्धां स्वतः परीक्षून मग नमूद करणें अधिक इष्ट आहे. राजवाड्यांच्या दुसऱ्या खंडांत मित्तींच्या पुढें कंसांत तारखा दिल्या आहेत; त्या कोणी दिल्या आहेत, हें कळत नाहीं, पण त्या कोणत्या तरी चुकीच्या जंत्रीवरून दिलेल्या आहेत. उदाहरणार्थ पृष्ठ ७२ वर रघुनाथरावाच्या जन्माची तारीख १३ आगष्ट १७३४ अशी दिली आहे; पण ती चुकीची आहे. खरी तारीख १ ऑगष्ट १७३४ ही पाहिजे. सन १७५२ सालीं इंग्लंडांत पार्लमेंटनें कायदा पास

* खरे शास्त्रांनीं कित्येक ठिकाणीं पत्रांत नसलेली अवांतर माहिती दिलेली आहे व कित्येक ठिकाणीं पत्रांतील म्हणून गैरसमजुतीनें भलतीच माहिती लिहिलेली आहे; याला एक उदाहरण देतों. इचलकरंजी संस्थानच्या इतिहासांत पृष्ठ ११२ वर शास्त्रीबोवा म्हणतात, "नारायणराव यांचा खून झाल्यानंतर रघुनाथराव दादा साहेब हे पेशवे झाले. त्यांनीं 'अमूबाईकडे लाट व रांगोळी हे गांव आहेत, त्यांस उपद्रव देऊं नये,' असें कोल्हापूरचे कारभारी येसाजी शिंदे यांस पत्र लिहिलेलें आहे." म्हणजे हें पत्र रघुनाथरावानें येसाजीस नारायणरावाच्या खुनानंतर स्वतः पेशवा झाल्यावर लिहिलें असें शास्त्रीबोवा म्हणतात. इचलकरंजी दप्तरांतील निवडक पत्रेंयादींच्या पुस्तकांत पृष्ठ १२४ नंबर १०६ येथें हें वादविषयक पत्र आहे. तें रघनाथरावानें येसाजीराव शिंदास छ. १४ रबिलाखर, सु ॥ आर्बा सबैन मय्या व अल्लफ रोजीं, म्हणजे तारीख १५ जुलई सन १७७३ गुरुवारीं, लिहिलें आहे. नारायणरावाचा खून तारीख ३० ऑगस्ट सन १७७३ सोमवारीं, म्हणजे रघुनाथरावानें वरील पत्र लिहिल्यानंतर दीड महिन्यानें झाला; व म्हणून या वेळीं रघुनाथराव पेशवा नव्हता हें उघड आहे. असें असतां शास्त्रीबोवांनीं गैरसमजुतीनें भलताच मजकुर इतिहासांत नमूद केला आहे.


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

अनुक्रमणिका

करून ता. ३ सप्टेंबरच्या ऐवजीं तारीख १४ सप्टेंबर केली व तेव्हांपासून ग्रेगोरियन पद्धति सुरू केली. म्हणजे या पद्धतींत पूर्वीपेक्षां १२ दिवस अधिक वाढविले. ही बारा दिवसांचीच चुकी वरील उदाहरणांत दिसते. म्हणजे ग्रेगोरिअन पद्धतीनेंच १ ऑगष्ट १७३४ ही तारीख येत असूनही कोणी तरी आणखी बारा दिवस अधिक वाढविले आहेत. तसेंच पहिल्या खंडांत राजवाड्यांनीं काव्येतिहाससंग्रहांतील सुमारें १७९ पत्रांच्या तारखा ठरविल्या आहेत, त्यांपैकीं कित्येक चुकीच्या आहेत, असें दिसतें. उदाहरणार्थ:–

नंबर १ ] ६८ च्या पत्रास ६ एप्रिल १७४७ अशी तारीख दिली आहे. यांत एप्रिलच्या ऐवजीं मे महिना असावा.

नंबर २ ] ७९ च्या पत्रास ३ एप्रिल १७४७ अशी तारीख आहे. येथें सन १७४८ असावा.

नंबर ३ ] १६८ च्या पत्रास ३१ मार्च १७५७ अशी तारीख आहे. तेथें १७५१ असा सन पाहिजे.

असो. अशा प्रकारच्या चुका कोणी मुद्दाम करितो असें नव्हे. कार्यांचें बाहुल्य, पत्रांचे ढीग, मित्तींचा गोंधळ, मुसलमानी तारखांची खिचडी, जंत्रीची बारीक छपाई, आणि मुद्रणदोष, इतक्या अडचणींतून बरोबर तारीख, वार, महिना, सन, प्रसिद्ध करणें कल्पनातीत कष्टमय आहे. हें विस्तारें करून सांगण्याचा हेतु एवढाच कीं, इतिहासलेखकानें या बाबतींत सुद्धां कोणावरही विश्वसून चालतां उपयोगी नाहीं.

२. या गोष्टी आज सुचण्याचें कारण सवाई माधवराव यांची तसबीर होय. कित्येक लोकांनीं सवाई माधवरावांसंबधानें दोन प्रकारच्या दंतकथा (Scandals) प्रचलित केलेल्या आहेत. ( १ ) गरोदर गंगाबाईला पुरंदरावर ठेविली तेव्हां कित्येक गरोदर स्त्रिया तेथें ठेविल्या होत्या, त्यांत एक सोनारीण होती, व तिचा मुलगा हा सवाई माधवराव असून, गंगाबाईस मुलगी झाल्यानें प्रसूतिसमयीं नानाफडणविसानें या मुलांची अदलाबदल केली आहे. ( २ ) नाना फडणवीस व गंगाबाई यांचा कांहीं गुप्त संबंध होता व त्याचेंच फळ हा सवाई माधवराव होय. याप्रमाणें हा नानाचा मुलगा असल्यानें त्याच्या व नानाच्या चेहऱ्यांत विलक्षण साम्य आहे. अशा तऱ्हेनें दोन दंतकथा प्रसिद्ध आहेत. त्यांचा आपण आतां तिऱ्हाईत या नात्यानें व कोणत्याही प्रकारच्या पूर्वग्रहाभें कलुषित न होतां विचार करूं.

३. तारीख ३० ऑगस्ट सन १७७३ रोजीं नारायणरावाचा खून झाला. तारीख १८ एप्रिल सन १७७४ रोजीं सवाई माधवरावाचा जन्म झाला, व तारीख २७ ऑक्टोबर सन १७९५ रोजीं सवाई माधवराव मृत्यु पावला. म्हणजे सवाई माधवरावास मरून नुकतींच १२५ सव्वाशें वर्षें पूर्ण झालीं आहेत. इतका मोठा कालावधि मध्यंतरीं गेल्यानें या व्यक्तीनें दिलेल्या त्रासाबद्दल अगर सुखाबद्दल आपणांस वाईट अगर बरें वाटण्याचा मुळींच संभव नाहीं, आणि त्यांच्याबद्दल शक्य तितकी निःपक्षपातिता उत्पन्न होणें शक्य आहे व म्हणूनच या गोष्टींचा आज आपणांस शांतपणें विचार करावयाचा आहे.

४. गरोदर गंगाबाईस पुरंदरावर नेऊन ठेविलें, त्या वेळीं इतर कांहीं गरोदर स्त्रियाही तेथें नेऊन ठेविल्याचा कांहीं बखरींतून[1] उल्लेख आहे. मागें कलम २ मध्यें दिलेल्या दोन दंतकथांपैकीं दुसरीचा आपण प्रथम विचार करूं. नाना फडणवीस व गंगाबाई यांचा अश्लाघ्य संबंध होता, ही गोष्ट मॅक्डोनल्डनें[2] लिहिली आहे; व त्यानें गंगाबाईच्या मृत्यूलाही अशाच प्रकारचें निंद्य कारण दिलें आहे. आपणांस फक्त माधवरावाच्या जन्मासंबंधानेंच विचार कर्तव्य असल्यानें त्या पुढील हकीकत बाजूस ठेवूं. मॅक्डोनल्डचे आरोप पुढें दिलेल्या अर्थाचे आहेत.

(१) नारायणरावाच्या मृत्यूनंतर पुष्कळ दिवसांनीं म्हणजे जानेवारीमध्यें गंगाबाई गरोदर असल्याचें प्रसिद्ध करण्यांत आलें.

(२) सवाई माधवरावाचा चेहरा हुबेहूब नाना फडणविसासारखा आहे, असें त्याच्या चित्रावरून दिसतें.

या दोन कारणांवरून मॅक्डोनल्ड याचें असें अनुमान आहे कीं, नारायणरावाच्या मृत्यूनंतर गंगाबाईस गर्भ राहिला व तो नानापासूनच राहिला असावा. परंतु मॅक्डोनल्डचीं दोनही विधानें खरीं नाहींत. कारण, गंगाबाई गरोदर असल्याची बातमी प्रसिद्ध

१ नारायणरावाची बखर.

२ मॅक्डोनल्डकृत नाना फडणविसाचें चरित्र.


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

करण्याचें श्रेय तीन बखरींनीं तीन निरनिराळ्या व्यक्तींस दिलें आहे. नारायणरावाच्या शवाबरोबर गंगाबाई सती जाण्यास तयार झाली, तेव्हां तिला प्रतिबंध करण्यासाठीं तिच्या गरोदरावस्थेची तिला जाणीव करून देण्यांत आली व म्हणूनच ती सती गेली नाहीं. हरिवंशाच्या बखरीमध्यें ही बातमी आनंदीबाईनें तिजला सांगितल्याचें लिहिलें आहे. नागपुरकर भोसल्यांच्या बखरींत हा मान राघोबादादास दिलेला आहे; व नारायणराव पेशव्यांच्या बखरीमध्यें हें श्रेय सदाशिवराव भाऊची पत्नी पार्वतीबाई, इजला देण्यांत आलें आहे. व्यक्ति जरी भिन्न असल्या तरी तीनही बखरींनीं प्रसंग एकच—नारायणरावाचें शवदहन केलें तोच सांगितला आहे. पत्रें व बखरी यांच्या आधारानें मॅक्डोनल्डनें नानाचें चरित्र लिहिलें असेल. परंतु तो आपल्या लिहिण्यास प्रत्यक्ष असा कसलाच आधार देत नाहीं. पुराव्याच्या दृष्टीनें त्याचें म्हणणें कितपत ग्राह्य समजावें हा प्रश्नच आहे; व म्हणून वरील बखरींचें लिहिणेंच अधिक विश्वसनीय होय. कलम ३ मध्यें दिलेल्या तारखांवरून वाचकांच्या हें लक्षांत येईल कीं, नारायणरावाच्या खुनानंतर (२२९) दोनशें एकुणतीस दिवसांनीं सवाई माधवरावाचा जन्म झाला. साधारणत: २८० दिवस भ्रूणावस्था असते असें शास्त्र आहे, त्यावरून नारायणरावाच्या मरणसमयीं गंगाबाईची नुकतीच पाळी चुकली असणें शक्य आहे; व म्हणून सवाई माधवराव हा नारायणरावाचाच मुलगा असणें अधिक संभवनीय आहे. कदाचित् मॅकडोनल्डच्या तर्फे असें सांगण्यांत येईल कीं, कित्येक मुलें सात महिन्यांतच जन्मतात, त्या अर्थीं सवाई माधवरावही तसाच सात महिन्यांचा असणें शक्य आहे. शिवाजी महाराजही सात महिन्यांचेच होते. + मॅक्डोनल्डची ही विचारसरणी ग्राह्य धरल्यास नारायणरावांच्या खुनानंतर एक महिन्याच्या आंतच गंगाबाईस गर्भ राहिला असावा, असा तर्क करावा लागेल. मॅक्डोनल्डच्या दृष्टीनें हाही तर्क गैरशिस्त ठरणार नाहीं. परंतु गंगाबाई ही पाश्चात्य अंगना नसून एक आर्यस्त्री होती, उच्च अशा ब्राह्मणवर्णीतील होती, वैदिक परंपरेंत वाढलेली होती, पेशव्यांसारख्यांच्या संपन्न घराण्यांत पडलेली होती, व नारायणरावासारख्या तरुण धाडाची सहधर्मचारिणी होती, या गोष्टी लक्षांत घेऊन मग वरील तर्काचा विचार केला पाहिजे. तात्पर्य, आपलेपणाच्या दृष्टीनें गंगाबाईच्या अवस्थेकडे पाहिलें म्हणजे मॅक्डोनल्डचा पहिला तर्क साफ चुकीचा, खोडसाळ, अतएव अविश्वसनीय वाटतो.

५. आतां मॅक्डोनल्डच्या दुसऱ्या तर्काचा विचार करूं. सवाई माधवरावाचा चेहरा नाना फडणविसासारखा आहे, असें तो म्हणतो. बाजीराव, राघोबा, माधवराव इत्यादींच्या चेहऱ्याप्रमाणें सवाई माधवरावाचा चेहरा नाहीं, हें खरें आहे. मुलाचा चेहरा बापासारखाच असावयास पाहिजे, अशी आपण चुकीची समजूत करून घेऊन सवाई माधवरावाचा चेहरा पाहतों, म्हणून ही अशी चुकी होते. शिवाय, नाना फडणवीस व सवाई माधवराव यांचे चेहरे जवळ घेऊन पाहिल्यास त्यांत त्यांची मान व लांबट चेहरा यांशिवाय इतर कशाचेंही साम्य दिसत नाहीं. नानाची मान उंच आहे, सवाई माधवरावाचीही मान उंच आहे. दुसरें, नानाचें तोंड लांबट आहे, तसें सवाई माधवरावाचेंही आहे. परंतु उभयतांच्या ओठांमध्यें व डोळ्यांमध्यें फार अंतर आहे. नानाचे ओंठ बाहेर आलेले आहेत, सवाई माधवरावाचे आंत बसल्यासारखे दिसतात. पेशव्यांच्या घराण्यांत सर्वांचेच भालप्रदेश भव्य आहेत, तेव्हां सवाई माधवरावाचें रुंद ललाट नानाच्या कपाळासारखें विस्तीर्ण होतें, या म्हणण्यांत कांहीं तथ्य नाहीं. तात्पर्य, चेहऱ्याचा लांबटपणा व मानेची उंची इतकेच काय ते वादाचे मुद्दे राहतात. आतां ज्याप्रमाणें पेशव्यांच्या पुरुषांच्या तसबिरा प्रसिद्ध आहेत, त्याप्रमाणें त्यांच्या स्त्रियांच्या कोठें प्रसिद्ध झाल्या आहेत? कदाचित् गंगाबाईचा चेहरा लांबट असेल व मानही उंच असेल; व तोच प्रकार माधवरावाच्या चेहऱ्यांत दृग्गोचर होत असावा. हा एक सरळ तर्क झाला.

६. प्रत्येक मुलाचा चेहरा त्याच्या आईसारखा अगर बापासारखा असलाच पाहिजे, असा नियम करणें मॅक्डोनल्ड यालाच शोभेल. वाचकांनीं या गोष्टीचें सूक्ष्मपणें निरीक्षण केल्यास अशीं शेंकडों उदाहरणें सांपडतील कीं, ज्यामध्यें मुलाचा चेहरा

+ मराठी दप्तर, रुमाल १, पृष्ठ १४.


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

अगदींच निराळ्या प्रकारचा आहे. साधारण लोकींच्या सुक्ष्म स्त्रियांविषयीं सुद्धां मूर्ख लोकांमध्यें वाटेल तसले तर्क चालू असतात; व श्रीमंतांच्या स्त्रियांबद्दल तर असल्या तर्कांना ऊत येतो, ही गोष्ट आजही पाहण्यास सांपडते. परंतु ऐतिहासिक व न्याय्य दृष्टीला या असल्या कल्पना अगदींच त्याज्य होत. नारायणरावाच्या खुनानंतर पेशवाईमध्यें दोन पक्ष उघडपणेंच वावरूं लागले. त्यामुळें एका पक्षानें दुसऱ्याच्या विरुद्ध वाटेल त्या कंड्या ( Scandals ) पिकविणें अगदीं संभवनीय आहे. ही तत्कालीन राजकीय परिस्थिति लक्ष्यांत घेतली व नानाच्या विषयलंपटतेला तींत मिळविलें म्हणजे ही सवाई माधवरावाच्या जन्माची कंडी कशी व केव्हां अस्तित्वांत आली असावी, याचें निश्चित अनुमान होतें. आतां सवाई माधवरावाचा चेहरा नाना फडणविसाच्या चेहऱ्याप्रमाणेंच होता असें जरी गृहीत धरिलें तरीही शरीरशास्त्राच्या दृष्टीनें पाहतां नाना व गंगाबाई यांचा गर्ह्य संबंधच असला पाहिजे, असें मुळींच दिसत नाहीं. काठेवाडामध्यें काठी घोड्यांना कोणत्याही घोड्यापासून गर्भधारणा करवितात. परंतु घोडी सबर झाल्यावर तिच्यासमोर ती प्रसूत होईपर्यंत एक सुंदर, देखणा घोडा ठेवितात. व रात्रंदिवस त्या घोडीला त्या सुंदर घोड्याचें दर्शन व चिंतन होत असल्यामुळें तिला होणारें शिंगरूं त्या मूळच्या वळू घोड्यासारखें होत नसून या सुंदर घोड्यासारखें देखणें व सुबक असें होतें, हा अनुभव प्रसिद्ध आहे. हा अनुभव गंगाबाईच्या बाबतींतही लागू करण्यास काय हरकत आहे ? एक महिन्याच्या सगर्भावस्थेपासून प्रसूति होईपयत गंगाबाईवर अनेक संकटें आलीं व त्या सर्वांतून मुख्यतः नानानेंच तिचें संरक्षण करून तिच्या नांवानें पेशवाई चालविली. यामुळें नानाची मूर्ति तिच्या डोळ्यापुढें व अंतःकरणामध्येंही कृतज्ञतेच्या बुद्धीनें वास करीत असणें शक्य आहे. आणि याचाच किंचित् परिणाम गर्भावर होणें साहजिक आहे. *

अशा दृष्टीनें आपण विचार केला तर गंगाबाईच्या वर्तनाबद्दल ज्या बातम्या प्रसिद्ध आहेत त्या दुष्टपणाच्या आहेत असेंच निःसंशय वाटतें. नाटककर्ते व कादंबऱ्याकर्ते या उभयतांनींही या गोष्टीस नसतेंच महत्त्व देऊन तिचा कल्पनातीत प्रसार केल्यानें वरील विवेचन थोडें अधिक विस्तृतपणें केलें आहे.

७. अंतर्वत्नी गंगाबाईबरोबर पुरंदरावर कित्येक सगर्भा स्त्रिया ठेविल्या होत्या, त्यांत एक सोनारीण होती, व सवाई माधवराव हा त्या सोनारणीचा मुलगा होय, † या दंतकथेबद्दल आतां आपण विचार करूं. अशा तऱ्हेची मुलांची अदलाबदल अर्वाचीही होते. राघोबाच्या कारकीर्दींत प्रतिनिधींच्या कुटुंबानें आपल्याला झालेला मुलगा आपल्या बहिणीस देऊन तिला झालेली मुलगी घेतल्याचा उल्लेख + आहे. नाळवारासुद्धां जर मूल सांपडलें वा घेतलें तर तें घेणाराच्या जातींत व धर्मात समाविष्ट होतें, असें धर्मशास्त्र आहे. या गोष्टींचा विचार केला तरीही नानाकडेस कांहीं दोष येत असेलसें वाटत नाहीं. आतां नानाच्या या कृत्यानें राजकीय दृष्ट्या राघोबाचें व तद्द्वारा देशाचें काय नुकसान झालें, हें सांगण्याचें हें स्थळ नव्हे, म्हणून तो प्रश्न आपण बाजूस ठेवूं. नानानें असें करणें शक्य होतें कीं काय, एवढाच आपला मुद्दा आहे. रघुनाथरावाच्या गैरहजिरींत बारभाईचें कारस्थान उपस्थित करून राघोबास

* The Modern Review च्या ऑक्टोबर १९२० च्या अंकांत पृष्ठ ४१४ वर "The Horse child" म्हणजे बाळ-तुंबरूची हकीकत दिली आहे, ती या बाबतींत वाचकांनीं अवश्य पाहण्यासारखी आहे. तिचा सारांश असा आहे कीं, एक बाई गरोदर असतांना घोड्याखालीं सांपडून तुडविली गेली. यामुळें त्या बाईच्या मनावर घोड्याबद्दल असा कांहीं विलक्षण परिणाम झाला कीं, ती बाई पुढें चार महिन्यांनीं प्रसूत होऊन तिला जी मुलगी झाली ती घोड्याच्या गुणधर्माप्रमाणें निपजली ती मुलगी हल्लीं चार वर्षांची आहे. ती घोड्यासारखी देहुडी (एक पाय दुसऱ्यावर अडकवून ) उभी राहते, खिंकाळते, हिंसते व मान हालविते. तात्पर्य, कोणत्या का कारणानें असेना, पण मनाला ज्या बाबतीचा वेध लागतो तिचा गर्भावर अवश्य परिणाम होतो, हें यावरून वाचकांच्या लक्ष्यांत येईल.

† नवलकृत "श्री. ताराबाईचें चरित्र;" उपसंहार, पृ. ८७–८८, आवृत्ति दुसरी.

+ ऐतिहासिक लेखसंग्रह, भाग चौथा, पत्र नंबर १२३४ पाहा


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

अनुक्रमणिका

नानानें पदच्युत केलें होतें, व नानाचें हें सर्व कारस्थान गंगाबाईच्या गर्भाच्या पुंस्त्वावर अवलंबून होतें. जर गंगाबाईस मुलगी झाली असती तर बारभाईंचीं पाळेंमुळें राघोबानें खणून टाकिलीं असतीं. किंबहुना नानासारख्यास तेव्हांच यमलोक दाखविला असता ! या गोष्टी लक्ष्यांत घेतल्या म्हणजे नानानें मुलांची अदलाबदल करणें दंडनीतीच्या दृष्टीनें अवश्य व शक्य आहे असेंच ठरतें. आतां पुरंदरावर ज्या अर्थीं पुष्कळ सगर्भा स्त्रिया ठेविल्या होत्या, त्या अर्थीं सवाई माधवराव हा कोणत्या जातीच्या स्त्रीच्या पोटीं झाला होता हा कांहीं महत्त्वाचा प्रश्न नाहीं. कोणाच्याही पोटीं झाला असला तरी तो नारायणरावाचा गंगाबाईच्या पोटीं झालेला नव्हता एवढेंच सांगणें महत्त्वाचें आहे. यावर नानाच्या तर्फेनें असें सांगण्यांत येतें कीं, गंगाबाईच्या या प्रसूतीच्या समयीं राघोबादादाची कन्या दुर्गाबाई [१] ही जवळ होती. म्हणून तिच्या हजिरीमध्यें अशी लबाडी होणें शक्य नाहीं. लोकांची खात्री पटविण्यासाठींच दुर्गाबाईस पुरंदरावर आणून ठेविलें होतें. हा नानाच्या तर्फेचा मुद्दा महत्त्वाचा आहे यांत शंका नाहीं. पण तो फार लंगडा आहे. कारण, या वेळीं दुर्गाबाइचें वय काय होतें हें आपण पाहिलें पाहिजे; व हीच यांत महत्त्वाची खोंच आहे. म्हणून आपण दुर्गाबाईचें या वेळीं वय काय होतें, याचा आतां विचार करूं.

८. रघुनाथरावाचीं दोन तीन [१] लग्नें झाल्याचा उल्लेख आहे. पहिलें लग्न गणेशभट बर्वे यांची कन्या जानकीबाई इच्याशीं तारीख २५ फेब्रुवारी १७४२ मध्यें झालें. [२] ही जानकीबाई तारीख २२आगष्ट सन १७५५ मध्यें निवर्तली. त्यानंतर तारीख १७ डिसेंबर सन १७५५ मध्यें द्वितीय संबंध झाला. हीच आनंदीबाई होय. ही गुहागराजवळील मळण गांवच्या राघो महादेव ओकाची कन्या. हें लग्न गलगलें येथें झालें. यानंतर भिकाजी महादेव पेंडसे यांची कन्या मथुराबाई इच्याशीं राघोबाचें तिसरें लग्न झाल्याचा उल्लेख 'काव्येतिहाससंग्रहां'त आहे ( प. या. पत्र ४९६ पृ. ५४१ ). असो.

९. पेशवाईच्या वेळी पांढरपेशांमध्यें बालविवाहाची चाल फार जोरांत होती. मुलांचें लग्न सुद्धां त्यांच्या आठव्या वर्षाच्या आंत होत असे, हें मागील राघोबाच्या उदाहरणावरून स्पष्टच होतें. मग मुलीचें लग्न तिच्या वयाच्या आठव्या वर्षाच्या आंतच होत असे ह्यांत नवल नाहीं. किमान वय सहा वर्षें व कमाल वय आठ वर्षें असा प्रघात दिसतो. राघोबाची पहिली पत्नी विवाहसमयीं म्हणजे सन १७४२ मध्यें सहा वर्षांची होती अशी आपण कल्पना केली, तर ती सन १७५५ मध्यें निवर्तली असल्यानें मृत्युसमयीं तिचें वय एकुणीस वर्षांचें ठरतें. व हें तिचें वय अपत्योत्पादनक्षम असल्यानें दुर्गाबाई तिची मुलगी असणें शक्य आहे. व खरोखरीच दुर्गाबाई जर या जानकीबाईची मुलगी असली, व जास्तींत जास्ती ही दुर्गाबाई आपल्या मातेच्या म्हणजे जानकीबाईच्या मरणाच्या वर्षी म्हणजे सन १७५५ मध्येंच जन्मली * असेल अशी जरी आपण कल्पना केली, तरी ती सवाई माधवरावाच्या जन्माच्या वेळीं म्हणजे सन १७७३ मध्यें अठरा वर्षांची असावी, असें अनुमान होतें. व खरोखरीच जर ही दुर्गाबाई, ही राघोबाची कन्या दुर्गाबाई, सवाई माधवरावाच्या जन्माच्या वेळीं अठरा वर्षांची असून ती गंगाबाईसन्निध पुरंदरावर असली व आनंदीबाईसंबंधीं सापत्नपणाचा यत्किंचित्‌ही लवलेश तिच्या मनांत नसेल अशी आपण कल्पना केली, तर मग या दुर्गाबाईच्या देखत नानाफडणविसाकडून सुद्धां ही मुलांची अदलाबदल होणें शक्य नाहीं. व हें अशक्य ठरलें म्हणजे सवाईमाधवराव हा गंगाबाईच्या पोटींच नारायणरापासून झालेला मुलगा होय, असें निःसंशय ठरेल. ( नारायणराव पेशव्याची बखर, पृष्ठ १२. )

१०. परंतु वरील विचारसरणीला एक फार मोठा विरोध आहे, व तो दुर्गाबाईच्या लग्नाचा होय. नारायणरावाच्या मरणापूर्वी म्हणजे सन १७७३ मध्येंच या दुर्गाबाईचें लग्न झाल्याचा उल्लेख हरिवंशांत आहे. व ऐतिहासिक लेखसंग्रह, भाग चौथा, पृष्ठ १९८०, पत्र नं. १२४६ यांत दुर्गाबाईच्या लग्नाची मिति माघ शु॥

१ पेशव्यांची बखर.

२ राघोबाचा जन्म ता १।८।१७३४ रोजीं झाला असल्यानें प्रथमविवाहसमयीं त्याचें वय अवघें साडेसात वर्षांचें होतें हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे.

* म. इ. सा. खंड १ ला, पृष्ठ १२३ येथें, यांबाईस याच वर्षी एक मुलगी होऊन निवर्तल्याचा उल्लेख आहे.


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

अनुक्रमणिका

१५ शके १६९४ अशी दिली आहे. मोडकांच्या जंत्रीप्रमाणें ही मित्ति म्हणजे तारीख ७ फेब्रुवारी सन १७७३ रविवार होय. या पत्रावर पौष व॥ १ अशी मित्ति छापिली आहे, पण ती चूक आहे. ती माघ व॥ १ अशी पाहिजे. आतां कलम ७ मधील नाना फडणविसाच्या तर्फेच्या विचारसरणीप्रमाणें दुर्गाबाई जर सन १७५५ मध्यें जन्मली असें समजलें, तर विवाहसमयीं तिचें वय सतरा वर्षांचें ठरेल. व पेशवाईमध्यें, ब्राह्मणपदपातशाहीमध्यें व रामशास्त्र्याच्या दृष्टीसमोर पेशव्यांचीच मुलगी सतरा वर्षेपर्यंत अविवाहित राहिली असेल, असें स्वप्नांत सुद्धां खरें वाटणें शक्य नाहीं. अर्थात् ही राघोबाच्या प्रथम पत्नीची कन्या नव्हे, याबद्दल सुतराम् शंका नको.

११. आतां दुर्गाबाई ही आनंदीबाईची मुलगी होती कीं काय हें आपण पाहूं. सन १७५५ मध्यें आनंदीबाईचा विवाह राघोबाशीं झाला. त्यावेळीं आनंदीबाई सहा वर्षांची होती, अशी आपण कल्पना करूं. दहा वर्षांनीं म्हणजे सन १७६५ मध्यें, अर्थात् सोळाव्या वर्षी, तिला ही दुर्गाबाई झाली असावी. व सन १७७३ मध्यें म्हणजे दुर्गाबाईच्या आठव्या वर्षी पांडुरंग नाईक बारामतीकर यांच्याशीं तिचा विवाह झाला असावा. अर्थात् विवाहसमयीं म्हणजे सन १७७३ मध्यें ती फार तर आठ वर्षांची असावी. आनंदीबाईला ही दुर्गाबाई बाराव्या अगर तेराव्या वर्षी ही होणें अशक्य नाहीं. * परंतु तशी कल्पना केल्यास दुर्गाबाईचें विवाहसमयीं दहा अकरा वर्षांचें वय होतें अशी कल्पना करावी लागेल. परंतु एवढी मोठी लग्नावांचूनची मुलगी पेशवाईमध्यें साधारण माणसाची सुद्धां होत नसे. मग खुद्द पेशव्यांची होत नसलीच पाहिजे, हें निराळें सांगावयासच नको. सन १७७३ मध्यें दुर्गाबाई जर अवघी आठ वर्षांचीच असली तर सन १७७४ मध्यें म्हणजे सवाई माधवरावांच्या जन्माच्या वेळीं पुरंदरावर असतांना ती फार तर नऊ वर्षांची असावी. व या नऊ वर्षांच्या मुलीची पुरंदरावरील हजिरी म्हणजे नाना फडणिसासारख्या कारस्थानी पुरुषास कांहीं आडकाठी होती, अशी कल्पना सुद्धां कोणी करणार नाहीं. ही नऊ वर्षांची अल्लड पोर नानासारख्यांचें कारस्थान हाणून पाडण्यासाठींच तेथें ठेविली होती; व तें कारस्थान हाणून पाडण्यास ती समर्थ होती, असें नानाच्या पक्षपातीयांनीं सांगणें म्हणजे नाना फडणवीस हा राजकार्यधुरंधर नसून एकाद्या साध्या गाढवाची धुराऽमानेवर वागविणारा चतुष्पाद प्राणी होता, असेंच सांगण्यासारखें आहे !!

१२. दुसरें, या नऊ वर्षांच्या दुर्गाबाईनें, "नानानें मुलांची अदलाबदल केली" असें जरी सांगितलें असलें तरी तिच्या या प्रमाणशून्य सांगण्यांवर विश्वास ठेवणार कोण ? तात्पर्य, आठ नऊ वर्षांच्या दुर्गाबाईला गंगाबाईजवळ पुरंदरावर पहारेकरी म्हणून ठेविण्यांत नानाची हुषारी व आनंदीबाईचा-अगर राघोबाचा म्हणा पाहिजे तर-वेंधळेपणाच दिसतो. किंवा दुर्गाबाईस प्रथमतः अहेतुपुरस्सरच ठेविली असून मागाहून हेतुपुरस्सरतेचा तिच्यावर वृथा आरोप केला गेला असावा असें ठाम अनुमान होतें.

१३. दुर्गाबाई ही रघुनाथरावाच्या तृतीय कुटुंबाची कन्या होय अशी कल्पना केल्यास विवाहसमयीं, म्हणजे सन १७७३ मध्यें, तिचें वय सात वर्षांहूनही कमी ठरेल. व तसें झाल्यानें नानाच्या पक्षास कांहींच फायदा नाहीं. म्हणून याबद्दल विशेष विवेचन नको.

१४. असो. आतां ही अनुमानपरंपरा पुरे. दुर्गाबाईच्या जन्माची मित्तीच देतों म्हणजे मग सवाई माधवरावांच्या जन्माच्या वेळीं खरोखरीच तिचें वय किती होतें हें आपोआपच नक्की ठरेल. भारतवर्षांतील पेशव्यांच्या शकावलींत अरबी सन ११६६च्या जमादिलाखर महिन्यांत दुर्गाबाईचा जन्म झाल्याचा उल्लेख आहे. या मुसलमानी माससालांत मोडकांच्या जंत्रीप्रमाणें शके १६८०चा मार्गशीर्ष महिना अगर नोव्हेंबर डिसेंबर सन १७६५ असे मराठी व इंग्रजी मास व सन येतात. दुर्गाबाईच्या जन्माची मित्ति अद्यापि उपलब्ध झालेली नाहीं. राजवाडेकृत चौथ्या खंडांत शेवटीं पेशव्यांची वंशावळ दिली आहे, तींत दुर्गाबाईचें गोदूबाई असें नांव दिलें आहे. यावरून असा तर्क होतो कीं, गोदूबाई हें माहेरचें नांव असून दुर्गाबाई हें सासरचें नांव असावें. कारण

* दुर्गाबाईच्या अगोदर विनायक नांवाचा मुलगा झाल्याचें व त्यास हातावर घेऊन उडवीत असतां तो खालीं पडून मरण पावल्याचें का. सं. पृ. ५४१, पत्र नं ४९६, यांत लिहिलें आहे.


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

अनुक्रमणिका

ग्रंथांतील गोदूबाईच्या लग्नाची जी मिति दिली आहे तीच दुर्गाबाईच्या लग्नाची आहे; व शरीरसंबंधही पांडुरंगराव बारामतीकराशींच झाल्याचा उल्लेख दोनही ठिकाणीं आहे.

१५. वरील विवेचनावरून वाचकांच्या हें लक्षांत येईल कीं, पुरंदरावरील दुर्गाबाईचें अस्तित्व नानास कोणत्याही प्रकारची हरकत करण्यासारखें नव्हतें. व म्हणून मुलांची अदलाबदल केल्याचा नानावर जो आरोप आहे, त्यास प्रत्यक्ष पुरावा नसला तरी, नानानें पुरंदरावर गंगाबाईच्या प्रसूतिसमयीं इतर अनेक गरोदर स्त्रिया आणून ठेविल्या होत्या एवढ्याचमुळें, संशयास्पद कां होईना पण बळकटीही येते. परंतु थोडा अधिक विचार करितां नानावरील हा आरोपसुद्धां टिकत नाहीं. तो विचार कोणता हें आपण आतां पाहूं. बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब यांचें मृत्युसमयीं डोकें फिरलें होतें, ही गोष्ट प्रसिद्ध आहे. म्हणजे नानासाहेब शेवटीं शेवटीं वेडा झाला होता. त्याचा मुलगा व सवाई माधवरावाचा पिता नारायणराव पेशवा याचें चरित्र जर आपण विशेष बारकाईनें पाहिलें तर तोही विकृत मेंदूचाच दिसतो. तासाचे तास धोतर नेसणें, विटाळ झाल्याच्या कल्पनेनें वारंवार स्नानें करणें, अधिकार हातीं येण्यासाठीं छत्रपतींचा उपमर्द करणें, भरदरबारांत वृद्ध मुत्सद्द्यांस शिव्यागाळी करणें, कोणाचे नाक कान कापणें, प्रजेपैकीं विशिष्ट जातीस आत्यंतिक त्रास देणें, आप्तांचा अमानुषपणें छळ करणें, एकाद्या क्रीडांगणांत मुत्सद्द्यांचें पागोटें उडविणें, वाड्यांतील फितुराची वेळींच वर्दी मिळाली असूनही खुशाल जाऊन झोंपणें, हीं सर्व कृत्यें **मूर्खपणाचीं नसून मेंदूच्या विकृतीचीं दर्शक** आहेत. नारायणरावाच्या या कृत्यांना कित्येक जण उद्धटपणा, उर्मटपणा, मूर्खपणा, बालिशता, मंदाधता इत्यादि विशेषणें देतात; पण तीं फारशी अन्वर्थक वाटत नाहींत. तो वेडाच होता व त्या वेडाच्या लहरींत मनसोक्त वर्तन करीत असे असेंच दिसतें. एरव्हीं कोणीही मनुष्य अवघ्या नऊ महिन्यांच्या कारकीर्दींत इतकीं अनन्वित कृत्यें करण्यास धजला नसता. संभाजीनें अशीं कांहीं कृत्यें केलीं आहेत, पण त्याला अल्प तरी कारण होतें. नारायणरावास तितकें सुद्धां नव्हतें. तात्पर्य, नारायणराव मूळचाच वेडा होता आणि सवाई माधवरावासही मरणापूर्वीं वेड लागलें होतें. यावरून पेशव्यांच्या घराण्यांत क्षय रोगाप्रमाणेंच वेडही नानासाहेबापासून पुढें तरी आनुवंशिक होतें हें उघड दिसतें. व म्हणून सवाई माधवराव निःसंशय नारायणरावाचाच मुलगा असला पाहिजे असें ठरतें. आणि सवाई माधवराव दुसऱ्या बाईच्याच पोटीं झाला असावा, हा लोकप्रवाद सत्य मानिल्यास दोन तर्क करावे लागतात. सवाई माधवराव नानासारखा कांहींसा दिसत असल्यानें नानाचा व त्या बाईचा कांहीं निंद्य संबंध असावा; हा एक, व त्या बाईच्या निदान माहेरच्या कुलांत तरी हा वेड लागण्याचा आनुवंशिक रोग असावा, हा दुसरा. अशा तऱ्हेचे तर्क करीत बसण्यास तूर्त तरी कांहींही आधार नाहीं. तेव्हां हे निराधार तर्क करून बुद्धिभेद करीत बसणें शाहाणपणाचें व सभ्यपणाचेंही होणार नाहीं. असले सैराट तर्क करणारास सुज्ञ लोक ' हिंदी रेनॉल्ड ' ही पदवी फार तर देऊन त्याची कृति कादंबरीच्या सदरांत घालतील !

१६. वरील एकंदर लेखाचें आतां थोडक्यांत तात्पर्य सांगतो:

१ कोणत्याही दृष्टीनें विचार केला तरी सवाई माधवराव हा नारायणरावापासून गंगाबाईच्या पोटींच झालेला असावा.

२ सवाइ माधवरावाच्या जन्मासंबंधीं जे कुत्सित अपवाद प्रचलित झाले ते तत्कालीन राजकीय परिस्थितीच्या अनुकूलतेमुळें नानाच्या प्रतिपक्षीयांनीं उपस्थित केले असावेत.

३ सवाई माधवरावाच्या जन्माच्या वेळीं आमंबीबाईची कन्या व बारामतीकरांची सून दुर्गाबाई ही फक्त आठ वर्षांचीच होती, यामुळें पुरंदरावरील तिची हजिरी नानाच्या लाभांत उतरत नाहीं.

१७. याप्रमाणें तीन सिद्धान्त प्रस्थापित होतात. हा विषय इतक्या विस्तृतरीतीनें प्रतिपादिन करण्याचें कारण इतकेंच कीं, नाटककादंबरीकारांनीं या गोष्टीस नसतेंच महत्त्व देऊन लोकमतास भलतेंच वळण लाविलें असल्यानें खऱ्या इतिहासाचें भयंकर नुकसान होण्याचा संभव आहे. हें नकसान न व्हावें, व सुज्ञांनीं उदात्तपणें या गोष्टीचा विचार करावा.

ता. २ ऑक्टोबर १९२०, बडोदें. } वि. स. वाकसकर.




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

# भाषा नष्ट होणार काय ?

[ रा. रा. नारायण महादेव भिडे, बी. ए. ]

' म्हणतात जे मराठी भाषा होणार ही असे नष्ट। मिळणार काय करुनी व्यर्थ हिला वांचवावया कष्ट ?'

—गं. रा. मोगरे.

कविवर्य मोगरे यांना वर कवितेंत केलेला प्रश्न करण्याचाच अवकाश, कीं त्यांचा सात्विक राग अनावर होऊन कवीच्या मुखांतून ' आपली माय जरी मरणोन्मुख असली तरी तिला तिच्या पुत्रांनीं औषध देऊं नये काय ? ' असें खडखडीत बाणेदार उत्तर बाहेर पडतें. वरील प्रश्न केवळ मराठी भाषेपुरताच केला होता, व त्याला उत्तर सुद्धां कोणत्याही आर्यपुत्राला साजेल असेंच स्वाभिमानाचें होतें, या गोष्टी खऱ्या आहेत. पण त्या प्रश्नोत्तरांतील भावना काढून टाकली व तें विचाराच्या कसोटीला लावलें तर मात्र मराठी भाषाच काय, पण सृष्टींतील सगळयाच भाषांचें दिवसेंदिवस नष्टचर्य ओढवत आहे असें दिसून येईल. जगांतील साऱ्या भाषा नाहींशा होणार, ही कल्पनाच मोठी विचित्र आहे. ती ऐकून पुष्कळांना हसूंच कोसळेल व कित्येकांची मजल तर तसें बोलणारांना वेडयांत काढण्यापर्यंत सुद्धां जाईल. हें सर्व झालें, तथापि जी वस्तुस्थिति आहे ती लपविणें मात्र शक्य नाहीं. कै० मोगरे यांनीं म्हटल्याप्रमाणें माता जन्म देते, तर भाषा व्यवहार चालविते, हें सकृद्दर्शनी खरें दिसलें तरी, तिच्यावांचून व्यवहार चालतच नाहींत किंवा तिच्याशिवाय एक पळही लोटणार नाहीं, हें म्हणणें निरर्थक होय. भाषा नष्ट होत आहे हें आमचें म्हणणें एकट्या-दुकट्या भाषेसंबंधानें नसून सुधारलेल्या न सुधारलेल्या अशा जगांतील यच्चावत् भाषांसंबंधानें असल्यामुळें, आम्हांस अभिमानशून्यता किंवा दुरभिमान यांपैकीं एकालाही बळी पडण्याची किमपि धास्ती नाहीं. भाषेचें उच्चाटन करावें, अशी कोणास स्वप्नांतही इच्छा अगर महत्त्वाकांक्षा वाटणार नाहीं. तथापि त्या मुद्दयाविषयीं मतभेद नाहीं असें घटकाभर धरून तो प्रश्न जरी सोडून दिला, तरी भाषेचा दिवसेंदिवस ऱ्हास होत चालला आहे, यासंबंधीं मात्र मुळींच वाद नाहीं.

जगामध्यें आज ज्या गोष्टी सुधारणेचें चिन्ह म्हणून समजल्या जात आहेत त्यांच्या योगानें भाषेची उन्नति होण्याऐवजीं जिकडे तिकडे तिचा सारखा ऱ्हास होत चाललेला दृष्टोत्पत्तीस येतो. हा ऱ्हास कोणी मुद्दाम जाणून बुजून करीत आहे असा आमच्या म्हणण्याचा आशय नाहीं. तो आपल्या हातून न कळत होत आहे. पण न कळतां गोष्ट होणें हें फारच अनिष्टकारक व भयप्रद असतें. ही मानवी प्रगतीच्या मुळावरच गदा आणणारी सुधारणा जर सर्वांनाच इष्ट वाटत असेल, तिचे परिणामही जर शेवटीं गोड व्हावयाचे असतील, तर ती सुधारणा दुष्ट असली तरी तशीच चालू राहिल्यास हरकत नाहीं. पण तसें जर नसेल, तर मात्र त्यासंबंधीं काळजी घेण्याचा काळ दुरावत आहे, असा होईल तितक्या लवकर इशारा देणें आम्हांस अवश्य वाटतें. त्या नष्ट सु–(कु?) धारणेला जर आळा घालावयाचा असेल तर आतां विलंब करून भागणार नाहीं.

प्रथम येथें ही गोष्ट सांगितली पाहिजे कीं, भाषेचा ऱ्हास होत आहे, या आमच्या म्हणण्याचा अर्थ असा नाहीं कीं, इतउत्तर जगांतील मनुष्यांचे परस्परव्यवहार अजीबात बंद पडतील. 'भाषा' या शब्दाचा अर्थ, दोन अगर अधिक व्यक्तींचें एकमेकांना मनोगत कळविण्याचें साधन–इतक्या व्यापकतेचा आम्ही विचारांत घेत नाहीं. कारण नेत्रपल्लवी व करपल्लवी या तरी एक प्रकारें भाषाच होत. इतकेंच काय, पण शेक्स्पीअरनें म्हटल्याप्रमाणें झाडांना जिभा असतात, तर धांवत्या ओढयांत पुस्तकाप्रमाणें ज्ञानप्राप्ति करून देण्याचें सामर्थ्य असतें. बाह्य स्वरूपांत पत्तर किती अक्कलशून्य दिसतो ? पण प्रसंगीं धर्मशास्त्राचे पाठ देण्यास तो सुद्धां कमी करीत नाहीं. उत्तररामचरित्रांत भवभूतीनें, पत्नीच्या असह्य विरहानें दग्ध झालेल्या रामचंद्राच्या दुःखपूर्ण असहाय स्थितीबद्दल, त्याविषयीं उत्कट सहानुभूति वाटत असलेल्या कठोरहृदयी दग-


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

अनुक्रमणिका

डांना सुद्धां पाझर फोडून त्याच्या बरोबर रडावयास लावलेंच कीं नाहीं? ही समरस स्थिति प्रदर्शित करणें हाही एक भाषेचाच मासला नाहीं काय? असो. ' भाषा ' हा शब्द वरील अर्थानें योजिलेला नसून त्याचा फारच संकुचित, म्हणजे बोलणें, लिहिणें, मुद्रित होणें वगैरे अक्षररूपानें सुव्यक्त झालेले उच्चार, या अर्थानें योजलेला आहे; व जी भाषा ऱ्हास पावत आहे असें आम्ही म्हणतों, ती हीच होय.

काय! भाषेचा ऱ्हास होत आहे? आज पाहवें तर जिकडे तिकडे शब्दकोष, ज्ञानकोष वगैरेंची अगदीं गर्दी उसळून गेलेली दिसत असून त्यासाठीं वेगवेगळीं मंडळेंही स्थापन झालीं आहेत. अशा प्रकारचे नित्यशः कोष तयार होत असून हजारों नवीन शब्दांचा त्यांत समावेश होत आहे. वर्तमानपत्रें आणि मासिक पुस्तकें यांनीं तर नव्या शब्दांची जणुं काय टांकसाळच पाडली आहे. इतकेंच नाहीं, तर, रात्रंदिवस चालू असलेल्या बोलण्यांतून, भाषणांतून व व्याख्यानांतून प्रत्येक घटकेला नवे नवे शब्द प्रचारांत येत आहेत. अशा वेळीं भाषेचा ऱ्हास होत आहे, ही गोष्ट कशी संभवेल? सकृद्दर्शनीं वरील विधान जरी धाडसाचें-किंबहुना निखालस खोटें दिसलें तरी तें सर्वांशानें खरें आहे, असेंच कोणाही विचारी माणसाचें मत होईल.

घडोघडीला शब्दकोषांचा आकार फुगत चालला आहे ही गोष्ट खरी आहे. पण मनुष्याच्या अंगावरील फुगवटीप्रमाणें ही फुगवटीही आंतली स्थिति नासकी कुसकी होत चालली आहे, याची स्पष्ट निदर्शक नाहीं म्हणून कशावरून? मासिकपुस्तकें व वृत्तपत्रें यांविषयीं बोलावयाचें तर, त्यांची तुलना एका पिढीपाठीमागील मासिकें व वृत्तपत्रें यांच्याशीं करून पाहिली तर आज-काल काय घडत आहे हें समजून येईल. ज्या ठिकाणीं उच्च तऱ्हेच्या चित्रांच्या जाहिरातींनीं गर्दी करून सोडली नाहीं, त्या ठिकाणच्या छापील मजकुराला निरर्थक अशा चित्रांनीं कमीअधिक प्रमाणानें शोभा आणविली जाते. पूर्वींच्या पुस्तकांतील पृष्ठें एकसारखीं असल्यानें बहुतेक कंटाळवाणीं वाटत असत; पण आतां त्यांना फोटोग्राफ, निरनिराळ्या चित्रविचित्र आकृति, हास्यकारक चित्रें, व दुसरे कितीतरी चित्त-वेधक प्रसंग यांनीं सजवून टाकलें आहे! यावरून कांहीं काळानें ' अक्षरविहित ' किंवा 'कोरीं' वर्तमान-पत्रें निघूं लागण्याचें भविष्य कोणी वर्तविल्यास त्यांत नवल नाहीं. चित्रांच्या योगानें नेत्रांना संतोष-विण्याची ही जी पद्धति प्रचारांत आली आहे, ती जुनीपुराणी होत आहे असें नसून, तिचा नुकताच कोठें प्रारंभ झाला आहे. यावरून तसल्या प्रकारचा फैलाव अजून किती व्हावयाचा आहे याचें अनुमा-नच करणें बरें. सिनेमा ऊर्फ चलच्चित्रपटामध्यें एक आठवड्यापूर्वींची हकीकत चित्ररूपानें दाखविली जाते, ही गोष्ट पाहिली म्हणजे भविष्यकाळीं सध्यांच्या वृत्तपत्रांमधून अतिशय मोठी सुधारणा होणार आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं.

सार्वजनिक सभांतूनही हीच स्थिति घडून येत असल्याचीं स्पष्ट चिन्हें दिसत आहेत. प्राचीन काळीं महत्त्वास चढलेली वक्तृत्वकला सांप्रत बहुतेक मृतप्राय झाली आहे. कोणतेंही राष्ट्र घेतलें तरी पूर्वींप्रमाणें आतां वक्त्यांची निपज होत नाहीं, हें कोणासही नाकबूल करवणार नाहीं. इतर किरकोळ विषयांवरचीं व्याख्यानें सोडून देऊन शास्त्रीय विषयांसारख्या गंभीर व गहन विषयांवर झालेलीं व्याख्यानें पाहिलीं तर वक्त्याला इतर उपकरणावांचून आपलें व्याख्यान श्रोत्यांच्या मनावर पूर्णपणें बिंबवितां येणें कठीण पडतें. रसायनशास्त्रावरील किंवा वैद्यकीसंबंधींच्या व्याख्यानांत शब्दांपेक्षां उपकरणें व प्रयोग यांचाच जास्त महत्त्वाचा उपयोग होतो. प्रसिद्ध हिंदी शास्त्रज्ञ सर जगदीशचंद्र बोस यांना आपल्या व्याख्यानासाठीं उपकरणांचें केवढें मोठें लटांबर जवळ बाळगावें लागतें याचा प्रत्यय दोन वर्षांपूर्वीं महाराष्ट्रीयांना येऊन चुकलाच आहे. हीच स्थिति अर्थशास्त्र किंवा समाज-शास्त्र यांवरील व्याख्यानांचीही होते. त्या विषयां-संबंधीं ऊहापोह करणाऱ्या व्याख्यात्यांना आपलें म्हणणें सप्रमाण सिद्ध करण्यासाठीं आंकड्यांवर व कोष्टकांवरच सारी भिस्त ठेवावी लागते. औत्सुक्य-भरानें जगभर फिरणाऱ्या प्रवाशाला व अज्ञानप्रदे-शांचा माग लावणाऱ्या धाडसी शोधकाला आपल्या प्रवासाचा व शोधाचा वृत्तांत जनतेला कळविण्यासाठीं जिभेपेक्षां मकाशाकडेच बोट दाखवून घरेंचसें काम भागवावें लागतें. यावरून असें म्हणतां येईल कीं,


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

कोणत्याही विषयावर बोलणाऱ्या वक्त्याचा परिणाम भाषेपेक्षां वस्तु आणि चित्रें यांच्या साहाय्यानें उत्कृष्ट होतो.

कीर्तनास पळत सुटणारा श्रोता हरिदासबोवांच्या तात्त्विक विवेचनापेक्षां त्याच्या गायनाला व हावभावाला जास्त भाळून जातो. ज्या कथेला बाजाच्या पेटीचा नाद नाहीं व मृदंगाची साथ नाहीं तिला रंग चढत नाहीं व ती प्रत्येकास नीरस झाल्यावांचून राहत नाहीं. अशा कथेला श्रोत्यांचा सदा दुष्काळच असावयाचा. तेव्हां लोकांचें लक्ष्य वेधून घेण्यास शब्दापेक्षां सूरच जास्त कारणीभूत होतात, असें म्हटल्यास चूक होणार नाहीं. निःशब्द भाषा नुसत्या मुक्याला व अर्भकालाच अवगत असते असें नाहीं. तिचा उपयोग कसा करावा हें शहाण्यासुरत्या बोलक्यालाही अभ्यासानें चांगलें समजतें. शंकराच्या देवळांत जाणारा भाविक आपल्या देवतेला शाब्दिक प्रार्थनेनें न आळवितां एकतर मूकभाव धरून निःशब्दतेनें, किंवा तोंडाचा मृदंग करून त्यावर बोटांनीं चापट्या मारमारून मृदंगध्वनीचें अनुकरण करणाऱ्या शब्दहीन भाषेनें, नित्य रिझवितांना दिसतो. परमेश्वराचें गुणवर्णन करण्याला खुद्द वेदांनाही ज्या अर्थी त्यांच्या शब्दांपेक्षां मूकभावच जास्त उपयोगी पडला, त्या अर्थी शब्दांपेक्षां निःशब्दानेंच अधिक महत्त्वाचा कार्यभाग होतो हें उघड आहे. प्रतिवर्षी श्रावणीच्या दिवशीं शाळेंतील मुलांप्रमाणें मोठ्या मंडळीच्या शाळेचा देखावा व तिथें चाललेली त्यांची कवाईत पाहून जें कौतुक वाटतें, किंवा उपाध्यायाच्या मास्तरी बाण्याच्या शिस्तपूर्वक लटपटीनें व अज्ञान वेदमंत्रांच्या दीर्घ घोषानें मनाला जी करमणूक होते, तिच्यांतील बराचसा भाग जर त्यांतील विधिकर्मांना चाट मिळाला तर नाहींसा होण्याचा संभव आहे. तसेंच अर्थशून्य म्हणून नुसत्या शाब्दिक नादानें श्रोत्यांचे मनावर गांभीर्यपूर्ण भावनेचें जें विरल पटल पसरतें तें सार्थ शब्दांचा उच्चारानें म्हणजे भाषेनें विस्कळित होण्याचीही निःसंशय भीति आहे. सत्यनारायणासारख्या श्रद्धामय बाबींतही ही संगीताची ध्वनिमधुर लाट राजरोस शिरलेली पाहिली म्हणजे भाषेचा नायनाट किती अंशाला पोंचला आहे, हें समजून येईल. साध्या व सरळ शब्दांत सांगत असलेल्या पुराणाला कितीसे श्रोतृजन मिळतात? पण संगीत पूजेला मंडप भरून गेलेला दिसतो.

धार्मिक बाबींनंतर आपण नाट्यशास्त्राकडे वळूं. नाट्याच्या उदयाबरोबर कथाकीर्तनाला श्रोत्यांची वाण भासूं लागली. शक्य तितक्या परीनें शब्दांना काट देण्यांतच नाटकाची खरी खुमासी आहे असें पाश्चात्य नाट्याचार्यांप्रमाणें अर्वाचीन व प्राचीन पौर्वात्य नाट्याचार्यांचेंही मत नाहीं काय? नाटकाची रंगीत तालीम चालू असतांना पात्रांच्या हावभावांत व चर्येवर उमटणाऱ्या भावनेंत विशेष प्रकारचा फरक केला, तर मुळच्या हस्तलिखित प्रतींतील सबंध पानच्या पान निरर्थक ठरतें. कारण तिच्यांत शब्दद्वारा प्रथित केलेला भाव अन्य तऱ्हेनें प्रगट झाल्यामुळें त्या मजकुराची द्विरुक्ति होते. यावरून भाषा आणि भावना या दोहोंतील संबंध किती निकट आहे, याची दृढ कल्पना करतां येणें शक्य आहे.

रंगभूमीवर प्रवेश करून नट केवळ आपल्या सार्थ हावभावानें व भावनायुक्त मुखचर्येनें प्रेक्षकांच्या दृष्टीला, तसेंच अभिप्रेत भिन्न स्वर काढून श्रोत्यांच्या कर्णेंद्रियाला, आपल्या मनांतील भाव तोंडांतून एकही शब्दोच्चार न करतां व्यक्त करूं शकतो. अर्थात् कृति आणि हावभाव यांच्या प्रमाणें स्वरभेद आणि स्वराघात या साधनांचा उपयोग नाट्यशास्त्रांतून शब्दाचें उच्चाटन करण्याकडे होत आहे.

याच दृष्टीनें विचार केला तर गायनकला ही काय चीज आहे ? तिचासुद्धां खरोखर भाषाविनाशाकडे उपयोग होत आहे. ही कला म्हणजे भावना व्यक्त करून दाखविण्याचा उत्कृष्ट प्रकार होय. एकंदरीनें, खरें पाहूं जातां, सुधारलेल्या जगांतील कोणतीही कला घेतली तरी तिचा कल एकाच दिशेला झुकलेला आहे असें दिसून येईल. तो कल म्हणजे दुसऱ्या चांगल्या गोष्टीचा शोध लावून भाषेची पिच्छेहाट करण्याचा यत्न करणें हा होय.

गायनकला सोडून दिली तरी वाङ्मयाच्या दृढ साहचर्यानें आणि साहाय्यानें भाषेच्या नष्टचर्यास आळा बसेल असें जर कित्येकांस वाटत असेल तर


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

तीं त्यांची चूक होय. प्रथम दर्शनीं भाषाविनाशाच्या वरील विधानाला वाङ्मय अपवादक दिसेल, पण तो अपवाद केवळ वरपांगी होय. वाङ्मयाचें शुद्ध-स्वरूप म्हणजे काव्य; व काव्यांतील मुख्य गोष्टी जर तालबद्धरचना आणि शब्दचित्रें हीं होत, तर काव्याच्या योगानें तालबद्धता आणि चित्रें यांवांचून बाकीच्या सार्‍या गोष्टींना वाङ्मयाच्या क्षेत्रांतून हकालपट्टी मिळत आहे हें सिद्ध होतें. या दृष्टीनें पाहिलें तर या वाङ्मयिक क्षेत्रांत प्रकाश व ध्वनि यांच्याच साहाय्यानें विचाराला चलन मिळत असतें. बौद्धिक बळाच्या जोरावर केवळ शब्दांशीं खेळ खेळणारे नामधारी कवि सोडून आपण जर उज्ज्वल प्रतिभासंपन्न असे जाति-वंत कविपुंगव घेतले तर शब्दांचा होईल तितका कमी उपयोग करण्याकडे त्यांचा स्वाभाविक कल असतो असें दिसून येईल. अशा रीतीनें भाषेचा उच्छेद करण्याच्या दुष्ट हेतूनें नसला तरी शब्दांचा कडक रीतीनें संक्षेप करण्याकडे त्यांचा नित्य प्रयत्न चालू आहे. व तो किती उत्साहानें चालला आहे याची साक्ष 'एकमात्रालघुत्वेन पुत्रजन्ममहोत्सवः' असें समजणारा किंवा त्या आनंदातिशयानें बेहोष होऊन जाणारा वैयाकरण पंडित देईल.

हें एका वर्गाविषयीं झालें. पण शब्दाच्या टरफला-वरील अर्थाचें ग्रहण करणाऱ्या गद्याळू लोकांचा जो दुसरा मोठा वर्ग आहे, त्याला मात्र हा सर्व असत्या-भास वाटल्यावांचून राहणार नाहीं. त्यांच्या मतें एखादा प्रबंध रचणें म्हणजे अनेक शब्दांची विवक्षित पद्धतीनें जुळणी करणें होय. प्रत्येक शब्दाला त्याचा स्वतःचा अर्थ आहेच. या अनेकविध अर्थांपासून जो सामुदायिक एकसूत्री अर्थ निघतो, तो त्या प्रबंधाचा होतो. तेव्हां भाषेंतून जर शब्द गळूं लागले तर ज्या प्रमाणानें ते गळूं लागतील त्याप्रमाणानें प्रबंधांतील अर्थामध्यें अपुरेपणा राहील. व ही स्थिति तशीच चालली तर परस्पर विचारांचें अर्थग्रहण होणें अशक्य होऊन पुन्हां एकवार जुन्याकारारशास्त्रांत वर्णन केलेला बाबेलचा विचित्र देखावा दृष्टीस पडेल. या शंकेला उत्तर इतकेंच कीं, अशा लोकांना शब्दांचें पुरतें ज्ञान नाहीं. शब्दार्थांचा दोन तऱ्हेनें उपयोग केला जातो. हा उपयोग जितक्या चांगल्या रीतीनें कवींना कळतो तितकें ज्ञान वरील प्रकारच्या गद्याळूंना होत नाहीं.

> ' तीं तीं पदें नित्य फिरूनि येती,
> त्या त्याचि अर्थांप्रति दाविताती;
> कौशल्य मोठें रचनेंत आहे,
> सत्काव्य तेणें नव वाटताहे.

या सुभाषितांत म्हटल्याप्रमाणें कवि जरी अनेक शब्दांची एकत्र जुळणी करीत असला, तरी तो ती अशा खुबीनें करतो कीं, वाचणाराच्या मनांत बाह्या-र्थापेक्षां अनिर्वाच्य किंवा अव्यक्त असा मनांतील दुसराच गूढ व चमत्कृतिपूर्ण अर्थ सुचतो. याच कलेला साहित्यशास्त्रांत ' लक्षणा ' असें नांव आहे. या लक्षणेचें काव्यांत इतकें महत्त्व आहे कीं, एका ओळीवरून दुसऱ्या ओळीवर डोळे फिरत असतांना मन शब्दशः उचंबळूं लागतें. विजेच्या चकमकाटा-प्रमाणें बुद्धीची चमक प्रत्येक पृष्ठावरून अविरतपणें विलसत राहते. ज्याप्रमाणें झाडांच्या बुंध्यापाठीमागून लहान मुलें समोर डोकावून पाहतात, त्याप्रमाणें अक्षराच्या मागें कोणता अर्थ गर्भित आहे हें पाह-ण्यासाठीं वाचकांना उंच मान करावयास ती लावते.

पण पुष्कळ वेळां असें दिसतें कीं मनांतील गोष्ट छपवून ठेवण्यासाठींच भाषेचा उपयोग केला जातो. आंग्लकवि यंग यानें म्हटलें आहे कीं,

> 'Where nature's end of language is declirned,
> 'And men talk only to conceal the mind.'

अशा प्रसंगीं, बोलणाराचे विचार प्रगट करण्यासाठीं भाषा निर्माण झाली नसून ती ते विचार लपवून ठेवण्यासाठीं उत्पन्न झाली आहे कीं काय असा दृढ संशय येऊं लागतो. हा संशय निराधार असला तरी त्याची सत्यता सिद्ध करण्याचे कामीं पांडित्याचें प्रदर्शन करणाऱ्या शिरोमण्यांना व उपरिनिर्दिष्टिलेल्या गद्या-ळूंना जितकें श्रेय देतां येईल, तितकें तें दुसऱ्या कोणाच्याही वांट्यास खास जाणार नाहीं.

आजच्या घटकेला बोलावयाचें तरी, सर्वांत अली-कडे ज्या कलेचा शोध लागला आहे तिचाही या


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

शब्दाच्या विचारगोपनकार्याला चांगलाच पाठिंबा मिळाला आहे. मनुष्याच्या शरीरांत कृमिरूप जीवाणूंची जी दीनावस्था दिसते तीच या नव्या कलेंतील भाषेची होते. ही अर्वाचीन कला म्हटली म्हणजे चलच्चित्रपट होय. आज दिसणारा हा चित्रपट उद्यांच्या सुधारलेल्या चित्रपटाचा केवळ पाया आहे. तेव्हां इतक्यांतच त्याच्याकडून जर लाखों शब्दांना गचांडी मिळाली आहे, तर पुढें तो काय काय अनर्थ उडवील, याची नुसती अटकळ करणेंही कल्पनेच्या बाहेरचें आहे.

कधीं कधीं असें दिसतें कीं, मनुष्यजात उत्पन्न झाल्यापासून तिला जणुं काय प्रथम चित्रापासूनच विचार करण्याची संवय लागली असावी. ही कल्पना जर खरी असेल तर अक्षरांचा शोध लागल्यापासून त्या संवयीचा जो एकदा लोप झाला तो ती पुन्हां चलच्चित्रपटाच्या योगानें उदित होऊं लागेपर्यंत तसाच होता. या दृष्टीनें या कलेचें महत्त्व कोण कमी लेखणार आहे ?

शास्त्रीय विषयाच्या बाबतींत तर वरील मताला दुजोरा देणारा किती तरी पुरावा सांपडूं शकेल ! भाषेचा र्‍हास घडवून आणण्याचे कामीं शास्त्रज्ञांनीं तर पुढाकार घेतला आहे, असें म्हटल्यास पुष्कळांना जरा चमत्कारिक वाटेल. पण वास्तविक गोष्ट वर सांगितल्याप्रमाणेंच निःसंशय आहे. 'शास्त्रज्ञ' या शब्दाची मुळीं व्याख्याच करूं जातां ती 'शब्दाच्या ऐवजीं पदार्थांच्या साहाय्यानें विचार करणारा मनुष्य' अशी करतां येईल. आतां ही गोष्ट खरी आहे कीं, शास्त्रज्ञ झाला तरी तो आपली स्वतःची म्हणून एकादी अपूर्व भाषा वापरतोच. पण लब्धप्रतिष्ठित शास्त्रज्ञाहून खऱ्या शास्त्रज्ञाला अचूकपणें ओळखण्याची निश्चित खूण म्हणजे, ज्याप्रमाणें गणिती भली मोठी संख्या अगर कांहीं ठराविक शब्दसमूह वरचेवर येऊन कामांत घोटाळा होऊं नये म्हणून त्याऐवजीं एकादें साधेंच अक्षर योजतो, त्याप्रमाणें शास्त्रज्ञही घटकाभर उपयोगासाठीं म्हणून कांहीं संज्ञा उसन्या आणतो. अर्थात् त्या उसनेपणामुळेंच त्याला त्या संज्ञांबद्दल मुळींच स्वकीयभाव वाटत नसतो. त्या संज्ञा, व ज्यांच्याऐवजीं त्यांचा उपयोग केला जातो त्या वस्तु, यांच्यामध्यें कांहीं साधर्म्य बघावें तर तें शून्यच असतें.

शेवटीं सुद्धां, गणितांतल्या कृतीप्रमाणें, शास्त्रीय विषयांतही तीन कृति करावी लागते. म्हणजे उदाहरण संपविण्यापूर्वीं ज्याप्रमाणें गणिती नियुक्त लघु अक्षराऐवजीं मुळची संख्या किंवा शब्दसमूह पुन्हां योजून इष्टफल काढतो, त्याचप्रमाणें शास्त्रज्ञही उसना भाग टाकून देऊन मूळ वस्तूंचा अंगीकार करतो. पण मध्यंतरीं कोणत्या गोष्टीबद्दल कोणता संज्ञात्मक वाक्प्रचार योजला होता, याचें जर शास्त्रज्ञाला विस्मरण झालें तर मात्र त्याची हबेलंडी उडाल्यावांचून राहत नाहीं.

आणि म्हणून धार्मिक बाबतींतील विधिकर्मे, व कलांमधील संगीत आणि चित्रकला, हे ज्याप्रमाणें भाषोन्नतीच्या गाड्याला वाटेंत अडथळा करणारे प्रचंड फत्तर आहेत त्याप्रमाणें शास्त्रीय विषयांतील वस्तुमात्राचाही सररहा तोच उद्योग चालू आहे. भाषारूपी वस्त्राला वर दाखविलेल्या कसरी लागल्या असल्यामुळें खरोखर भाषेचें भवितव्य काळोखांत दडलेलें आहे. तिला इतके कांहीं वाईट ग्रह आले आहेत कीं, सरते शेवटीं तिचें अवाढव्य क्षेत्र स्मर्तव्य विषय होईल कीं काय, या शंकेचीं ठळक चिन्हें दिसूं लागलीं आहेत.

आतां कोणी असें म्हणतील कीं, वाङ्मयिक भाषेचा जरी संकोच होऊं लागला, तरी नेहमींच्या व्यवहारांतील भाषेचा,—उदाहरणार्थ घरगुती, बैठकींतील, घराबाहेर समाजांतील भाषेचा—तरी र्‍हास होणें शक्य नाहीं. होय वरील आक्षेप एका अर्थी खरा आहे. 'एका अर्थी' असें म्हणण्याचें कारण इतकेंच कीं, या ठिकाणीं आपण जी एक गोष्ट अजीबात विसरून जात आहोंत, ती म्हणजे वर भाषेची जी व्याख्या केली आहे, त्या सदरांत ही भाषा येत नाहीं. हिला जर 'भाषा' अशी अभिधा दिली, तर तो केवळ शब्दच्छल किंवा शाब्दिक पकड होय. असल्या नुसत्या पकडीपेक्षां बोलणाराचा मतलब ओळखणें श्रेयस्कर असतें. दिवसांतील प्रत्येक घटकेला असा अनुभव येत आहे कीं, आपण जेव्हां एकाद्या परिचित मनुष्याशीं बोलतों,


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

तेव्हां ज्या मानानें त्याची मैत्री असेल त्या मानानें विचारविनिमयाचे कामीं आपण भाषेची नेहमींची पातळी सोडून देऊन दुसऱ्या उच्चतर वातावरणांत प्रवेश करतों. त्यावेळीं संभाषणाला भाषेची मदत न घेतां डोळ्यांतील चमक, चेहेऱ्यावरील विकार, आवाजाची ढब, हातवारे, आणि हावभाव,–सारांश, सगळ्या शरीराची चलनवलनक्रिया–हीं परस्परांचे मनोमय विचार जाणण्याचीं साधनें होतात.

स्वगत विचार कळविणाऱ्या या सूक्ष्मयंत्राचा उपयोग जर आपापल्या परीनें जडबुद्धीच्या व आळशी लोकांनाही होणार आहे, तर मनांतील प्रत्येक विचाराची छटा चेहेऱ्यावर स्पष्टपणें उमटविण्याची कला ज्याला चांगली अवगत आहे, अशा तीव्रबुद्धीच्या मनुष्याला त्यापासून किती महत्त्वाचा उपयोग होईल हें सांगणें नकोच ! अडाणी मुक्या माणसाला ज्या गोष्टी दुसऱ्याच्या मनांत ठसवून देण्याला तासचे तास लागतात, किंवा ग्रंथकारास त्यांचें याथार्थ्यानें वर्णन करावयास आपल्या ग्रंथाचीं कित्येक छापील पृष्ठें खर्ची घालावीं लागतात, त्याच गोष्टी केवळ खांदा उडवून, डोकें खाजवून अगर हलवून, डोळे मिचकावून किंवा कोपरानें डवचून, फार काय पण 'हं' अथवा 'अगाई' एवढींच अक्षरें उच्चारून, दुसऱ्याच्या मनांत चांगल्या रीतीनें बिंबवून देण्यास किंवा स्वतःला समजण्यास तरबेज मनुष्याला फारसा वेळ लागत नाहीं.

भाषेचा उपयोग करण्याच्या तऱ्हेवरूनही मनुष्यांमनुष्यांतील बौद्धिक अंतर ओळखतां येतें. 'शुद्धे तु दर्पणतले सुलभावकाशः' या नियमाप्रमाणें अलौकिक म्हणून जे पुरुष जगांत प्रसिद्धीस येतात ते कुशाग्र बुद्धीचे असतात असें आपण पाहतों. याचा अर्थ, जेम्स डगलस या लेखकानें म्हटल्याप्रमाणें, इतरांपेक्षां 'त्यांच्या मेंदूंत रंध्र पडण्यास अतीशय सुलभ जातें,' हा होय. मंदबुद्धीच्या मनुष्यांत स्वभावतःच सुलभावकाशाचा ऊर्फ ग्राहकशक्तीचा अभाव असतो. एकादा मनुष्य बौद्धिक गुणानें श्रेष्ठ आहे कीं कनिष्ठ आहे, हें ठरविण्याची सर्वांत सुलभ कसोटी म्हणजे तो बोलण्यांत भाषेचा अवास्तव रीतीनें (दुर्) उपयोग करीत आहे, कीं त्यांत मार्मिक मोजकेपणा दाखवीत आहे, यावर अवलंबून आहे. थोर मनुष्यें अडाणी माणसाप्रमाणें उगाच वाचालता प्रगट करीत नाहींत. बोलतांना सामान्यतः लघुलेखकाचें किंवा विनतारी यंत्राचें ते अनुकरण करतात. मनांतल्या मनांत विचार करतांना सुद्धां त्यांना भाषेच्या साहाय्याची अपेक्षा नसते. या विचारावरून त्या विचारावर त्यांचें वानराप्रमाणें एकसारखें उड्डाण चाललेलें असतें. पण तीच अडाणी मनुष्याची स्थिति अगदीं भिन्न प्रकारची आहे. आपले विचार प्रकट करण्यासाठीं त्याला केवढा उपद्व्याप करावा लागतो, आसपासचा कितीतरी प्रांत तुडवावा लागतो, तेव्हां कोठें त्याला मनांतील अर्थ व्यक्त करून दाखवितां येतो. तथापि तसें करतांना त्याची किती वेळां तरी तारांबळ व फसगत होते, हें सांगावयास नकोच. बुद्धिमान इसम दाट कांटेरी अरण्यांतूनही अनायासानें आपली वाट काढतो, पण तोच अडाणी मनुष्य तुतीच्या मऊ झुडपामधूनही चालतांना जागोजाग अडखळतो.

इतकेंही असून, खरी वस्तुस्थिति पाहूं जातां, कोषांतून शब्दांचा जो अर्थ निघत असेल त्या अर्थानें त्या शब्दांचा जर उपयोग केला तर त्यापासून चलाख बुद्धीच्या व समानशीलव्यसन असलेल्या जिवश्च कंठश्च स्नेह्याला संभाषणप्रसंगीं कितीसा उपयोग होईल, याची जबरदस्त शंकाच आहे. इंजनाला वाळूपासून जितका उपयोग होईल तितकाच त्यालाही होईल असें म्हणावयास हरकत नाहीं. त्या ठिकाणीं कोषांतील शब्दांची त्यास जी मदत होते ती केवळ भाषणाच्या वालुकामय क्षेत्रांत विचाररूपी यंत्राचीं चाकें रुतून टाकण्याचें कामीं होत असते. सारांश, यंत्र चालविण्याकरितां ज्याप्रमाणें वाळूचा कांहींएक उपयोग होत नाहीं, त्याचप्रमाणें खऱ्या जिव्हाळ्याच्या संभाषणाला पोकळ शब्दांची जरूरी लागत नाहीं.

जिवलग मित्रांमित्रांचें ज्या वेळीं रहस्यांतील संभाषण चालतें, त्यावेळीं भाषेपेक्षां कृति आणि ध्वनि या दोन गोष्टीच जास्त महत्त्वाच्या ठरतात. वाशिंग्टन ऐर्व्हिंग या सुप्रसिद्ध अमेरिकन लेखकानें 'रिप् व्हान् विंकल' नामक गोष्टींत शब्दावांचून मत प्रगट करणाऱ्या एका खेडवळ खानावळवाल्याचें गमतीचें चित्र रेखाटलें आहे. त्या मनुष्याला बोलायला फारच


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

कमी हवें असे. इतकें कीं, दिवसांतून जितक्या वेळां तो चिलमींतून धूर काढतांना दिसे, तितक्या वेळां सुद्धां तोंडांतून 'ब्र' काढतांना तो जवळच्या सोबत्यानाही दिसत नसे. या अखंड मौनव्रतामुळें एकाद्या प्रश्नावर त्याचा अभिप्राय घेणें त्यांना जड जाई. यासाठीं आपली पसंती अगर नापसंती ठरविण्याची गुरुकिल्ली त्यानें आपल्या चिलीम ओढण्याच्या तऱ्हेवरून त्यांना दाखवून दिली. चिलीम जरा जोरानें ओढून तोंडातील धूर थोडका थोडका पण फुस्कान्यानें सोडला कीं गोष्ट आपणास पसंत नाहीं, उलट ती सावकाश व शांतमुद्रेनें ओढून मुखावाटे धुराचे फवारे हलके हलके बाहेर पडतांना दिसले कीं ती आपल्या पसंतीला उतरली, असें तो व्यक्त करी. ज्या वेळीं गोष्ट सर्वस्वी पसंत पडून स्वारी खुषींत दिसे त्यावेळीं चिलमीचे वरचेवर झुरके घेऊन ते जसजसे बाहेर पडत तसतसें, त्यांचें नाकाभोंवतीं चक्रीभवन होतांना, त्याचे डोळे सारखे तिकडे लागलेले दिसत. विक्षेपानें विचार व विकार दाखविण्याचें वरील उदाहरण व्यक्तिशः साधन असलें तरी त्याचा कलेच्या दृष्टीनें विचार करणें शक्य आहे. दुसरीं सामान्य उदाहरणेंही व्यवहारांत शेंकडो सांपडूं शकतील. आईबापें एकमेकांकडे बघतात न बघतात तोंच तिकडे मुलीच्या चेहऱ्यावर गुलाबी छटा दिसूं लागते. भावाचा कोठें वाकडा डोळा होतो न होतो तोंच त्याची बहीण मिठाचा पडगा पुढें करते. अर्भकाचा ओंठ खालीं लवतो न लवतो तोंच आई बिजलीसारखी त्याकडे धांवत सुटते. जेवणाचे वेळीं नवऱ्याचे तोंडून 'हः' एवढाच नापसंती दिणारा उद्गार बाहेर पडतो. बाहेर उभा असलेल्या इसमाला त्याचा कांहीं सुद्धां बोध होत नाहीं. पण वाढत असलेल्या त्याच्या पत्नीला त्या एकाच अक्षरापासून केवढा तरी अर्थबोध होतो. युवकाच्या निर्वाणीच्या प्रश्नाला तरुणीकडून 'नाहीं' एवढेंच नकारात्मक उत्तर मिळतें. पण या एका द्व्यक्षरी शब्दाचा जालिम प्रताप केवढा अनर्थकारक होतो बरें! त्याच्या हृदयांतील साऱ्या आकांक्षा, सारे मनोरथ, तत्क्षणींच ढांसळून पडतात. त्याला दाही दिशा शून्य भासून त्याच्या जीविताचा नाजूक धागाही तुटून जाण्याचा दर्शविणारा संभव दिसूं लागतो.

शब्दांच्या विशेष तऱ्हेच्या उच्चारानें किंवा आविर्भावानें, अथवा केवळ विशेष खुणांनीं, मनांतील भाव इतक्या सफाईनें व्यक्त होतो कीं, त्यासाठीं शब्दांची कितीही योजना केली तरी तो दाखविला जात नाहीं. आई आपल्या बालकावर किती ममतेनें प्रेम करते, व तें बालकही तिच्याबरोबर किती लडिवाळपणें वागत असतें, हें कोणी नव्यानें सांगावयास पाहिजे असें नाहीं. पण त्या बालकाच्या हातून कांहीं अपराध घडल्यामुळें शासन करण्याच्या इरायानें तीच आई जेव्हां क्रुद्ध मुद्रेनें त्याच्याकडे पाहते तेव्हां तें बालक तिच्या मुखाकडे एकवारच पाहून इतकें गर्भगळित होतें कीं, जणुं काय तिच्या मनांतील सारा आशय त्यानें जाणला व 'पुनरपि तशी गोष्ट तुझ्या हातून होतां कामा नये—' असें ती मुद्रा आपणास खरमरीतपणें बजावीत आहे इतकी जाणीव मुलाच्या मनांत उत्पन्न करावयाला आईला एका शब्दाचीही जरूरी पडली नाहीं. तिने केवळ भावपूर्ण मुद्रेनें तें व्यक्त केलें. हरदासाच्या गोष्टींतील 'नारायण' शब्दाच्या भिन्न भिन्न आवाजानें वेगवेगळे मनोविकार प्रतीत करणाऱ्या संन्याशाचेंही उदाहरण येथें लागू पडतें. शेक्सपीअरच्या मॅकबेथ नाटकांतही, राजाला मारण्याविषयींच्या प्रयत्नांत 'आपणास जर अपयश आलें?' अशी मॅकबेथ यास शंका येऊन, त्यानें आपल्या पत्नीस 'पण आपला बेत फसला तर?' असा भयसूचक प्रश्न केला. त्यावर लेडी मॅकबेथनें 'फसला' एवढेंच उत्तर दिलें. उत्तर त्र्यक्षरी एकच शब्दाचें आहे. पण त्यापुढें वेगवेगळीं विराम चिन्हे देऊन तें जर त्या तऱ्हेनें उच्चारलें, तर त्यांतून लेडी मॅकबेथचा भाव तीन भिन्न तऱ्हेनें प्रदर्शित होतो. त्या शब्दांपुढें पूर्णविराम देऊन जर त्यावर आघात दिला नाहीं, तर 'सारेंच फसलें, पुढचा विचार तरी कशाला!' हा भाव व्यक्त होतो. दुसरें, त्यापुढे प्रश्नचिन्ह असल्याप्रमाणें तो शब्द साघात उच्चारला तर 'काय, बेत फसला? फसणें अशक्य आहे.!' असा अर्थ त्यांतून निघतो. तिसरें, त्याचा उद्गारवाचक साघात उच्चार केला तर—'बेत फसला तर! आश्चर्य आहे. तुम्हांला असें वाटतें तरी कसें?' असें पतीला हेटाळणीच्या सुरानें धिक्कारित असलेली लेडी मॅकबेथ


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दिसते. शब्दापेक्षां अर्थवाहकाचे कामीं स्वरभेदाचा किती परिणामकारक उपयोग होतो, याची प्रचीती येण्यास वरील उदाहरणासारखें दुसरें उदाहरण सांपडणें कठीण.

ह्यावरून कोषांतून हुडकून काढलेल्या शब्दापेक्षां मनुष्याच्या आवाजानेंच जास्त कार्य होतें, असें दिसून येईल. एके ठिकाणीं म्हटल्याप्रमाणें, 'अक्षरानें नुसत्या शब्दाचीच जाणीव होते, पण आवाज ऐकला तर मात्र वक्त्याच्या बोलण्यांतील खऱ्या अर्थाची ओळख पटते.' ही गोष्ट अगदीं यथार्थ आहे, व तिचें प्रत्यंतर एखादें उत्कृष्ट भाषण ऐकून व तेंच इतरत्र वाचून मनावर होणाऱ्या परिणामांतील अंतरावरून सहजीं दिसून येईल.

लिहिण्याची ऊर्फ पांडित्यप्रदर्शनाची भाषा सोडून दिली तर घरांतील व्यवहारांत उपयोगी पडणाऱ्या भाषेंत शब्दांचा असलेला दुष्काळ नेहमीं प्रत्ययास येतो. यासंबंधीं कित्येकांचें असें म्हणणें आहे कीं, घरांतील साऱ्याच व्यक्तींना शिक्षणाचा लाभ मिळाला नसल्यानें तेथें तो दुष्काळ तीव्रपणें भासण्याचा संभव फार असतो. हा कार्यकारणभाव कांहीं अंशीं जरी खरा आहे, तरी पण त्यावरून घरगुती भाषेंत शब्दांचा तुडवडा नाहीं हें कांहीं सिद्ध होत नाहीं. आतांपर्यंत इतका काळ लोटला आहे कीं, त्या दिशेनें शब्दांचा भरणा जर होण्यासारखा असता, तर तो केव्हांच होऊन चुकला असता. भाषेची अद्याप संवृद्धि झाली नाहीं असें म्हणणें खरोखर मूर्खपणाचें होईल. भाषेमध्यें आतां सत्त्ववत्ता उतरली असून ती बऱ्याच परिगतावस्थेला पोंचली आहे, हें थोडयाशा विचारानेंही प्रत्येकास कबूल करावें लागेल. भाषेमध्यें सर्वांत जर कोणाची जास्त उणीव भासत असेल, तर ती असंदिग्ध विशेषणांची होय. उत्तम, चांगला, बरा, साधारण, वाईट, थोडा, फार, वगैरे गुणविशेषणांचा अर्थ सापेक्ष असल्यानें त्यांत इतकी विलक्षण विगुणता असते कीं, त्यांच्या ठिकाणीं निश्चितपणाचें नांवही उरत नाहीं. अशा स्थितींत एकाद्या बाबींवर अचूक आणि असंदिग्ध शब्दांत मत देणें किती तरी जड जातें. ही अनिश्चितपणाचीं अडचण घालविण्यासाठीं कधीं कधीं अन्य उपाय योजिलेले आढळून येतात. तसला एक खालीं दिलेला प्रकार नमुनेदार असून लक्षांत ठेवण्यालायक आहे. 'गृहिणी–' पदाला साजतील असे कोणते सद्गुण स्त्रीच्या अंगीं असणें आवश्यक आहे, या प्रश्नाला स्पष्ट शब्दांत उत्तर देतां यावें म्हणून एका स्त्रीनें त्यांत आंकडेशास्त्राचा उपयोग केला आहे. ती म्हणते 'मी गृहिणी आहें; माझ्या अनुभवावरून मी हें खात्रीनें सांगूं शकतें कीं, आदर्शभूत गृहिणी होण्यास प्रत्येक स्त्रीमध्यें चार गुण प्रामुख्यानें विशिष्ट प्रमाणांत असले पाहिजेत. ते असे:—

| | | | |
|---|---|---|---|
| सहनशीलता— | शेंकडा | ६० | टक्के |
| उल्हसित वृत्ति— | | २५ | |
| व्यवहारज्ञान— | | ९ | |
| सहानुभूति— | ,, | ६ | ,, |

या पद्धतीनें विशेषणांत असलेली संदिग्धता नाहींशी होऊन आपल्या म्हणण्याला (वरच्यासारखें बोलावयाचें तर) शेंकडा २०० टक्के निश्चितपणा येतो. संदिग्धपणांत सगळ्यावर ताण करून टाकणारें वैशेषिक स्वरूप जर कोठें पाहावयाचें असेल, तर तें नेहमीं प्रचारांत येणाऱ्या 'कांहीं' या शब्दांत दिसेल. त्याला कोणत्याही कोषांत समानार्थक प्रतिशब्दच सांपडत नाहीं. असल्या डळमळीत शब्दामुळें कितीक आईबापांची, आणि पालक व पंतोजी यांची, नित्य निराशा होत असेल बरें! एकाद्या प्रश्नाविषयीं त्यांनीं आपल्या मुलाला अगर चेल्याला जीव तोडतोडून विचारावें, पण उत्तर मिळतें तें दिसण्यांत जरी पूर्ण असतें तरी वस्तुतः पाहतां तें सर्वस्वी संदिग्ध व अपूर्ण असल्याची खात्री होते. याला कारण त्या उत्तरांत 'कांहीं' हा शब्द असतो म्हणून.

शरीरानें धष्टपुष्ट व निकोप असलेल्या विद्यार्थ्याला 'तूं कुठून आलास' म्हणून विचारलें तर 'मी कांहीं खेळ खेळून नुकताच आलों,' असें त्याजकडून उत्तर येतें. पण गंमत ही कीं उत्तर देण्याचे वेळीं जर त्याच्या शरीराच्या चलनवलनादि क्रियांकडे लक्ष दिलें तर आपणास असें दिसून येईल कीं, 'कांहीं' या शब्दाचा नेहमींचा 'कोणता तरी' असा कोषांतील


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

अनुक्रमणिका

अर्थ जाऊन त्यांतून 'शरीरांतर्गत चैतन्यरूपी गत्युत्पादक' अशा अर्थाची निष्पत्ति होत आहे. खरो-खर या दृष्टीनें त्या शब्दाकडे पाहूं जातां तो किती तरी उच्चार्थवाचक दिसूं लागतो. तेव्हां या किंवा अशा प्रकारच्या दुसऱ्या कित्येक अस्पष्टार्थ शब्दांचा विचार केला तर मनुष्याजवळचा शब्दसंग्रह जस-जसा वाढत जातो तसतशी त्याची स्पष्टीकरण कर-ण्याची शक्ति कां लोप पावूं लागते याचा बोध होईल.

खरें स्पष्टार्थत्व होणें म्हणजे गोष्टींतील सर्व बारीक सारीक खाचाखोंचा कळणें होय. या कामीं नुसत्या शब्दांचा उपयोग होणें नाहीं. शब्दांच्या योगानें होणारें ज्ञान सामान्य स्वरूपाचें, एतावता अपुरें असतें. खरा स्पष्टार्थ कळण्याला वस्तूच्या गुण-वैशिष्ट्याचें ज्ञान होणें जरूर आहे. स्पष्टार्थत्वाची ही विस्तृत कल्पना घेतली तर ती प्रदर्शित करण्याला मनुष्याजवळ एकंदरीनें शब्दांचा किती थोडका संग्रह आहे याची एकसारखी प्रचीति येत जाते. भिन्नभाषिकांचे व्यवहार शब्दांच्या साहाय्यावांचून कसे चालूं शकतात याचें उदाहरण शेक्सपीअरच्या एका नाटकांत ( चौथा हेन्री, भाग पहिला, यांत ) दृष्टीस पडतें. पति आणि पत्नी यांची बोलण्याची भाषा एक असणें आवश्यक आहे, व ती असतेही. परंतु जगांत असेंही एकादें जोडपें सांपडतें कीं, त्याला विचारविनिमयासाठीं भाषेपेक्षां इतर साधनांचाच उपयोग करून घ्यावा लागतो. असलें विचित्र जोडपें सदरील नाटकांत रंगविलें आहे. भिन्नभाषिक पति-पत्नीच्या परस्पर भावना कोणत्या साधनांनीं प्रतीत होतात याविषयीं मॉर्टिमर आपल्या पत्नीला उद्देशून बोलतो:—' तुझी बोली जरी मला उमजत नाहीं तरी तुझ्या चेहेऱ्यावर उमटणाऱ्या विकारांवरून मला तुझ्या मनांतील आशय कळून चुकतो. तुझ्या डोळ्यां-तून टिबकणाऱ्या अश्रूंनींच मला तुझी परकी भाषा चांगली अवगत होते. मला लाज वाटते म्हणून, नाहीं तर या भेटींत माझ्या या सुकुमार सोबत्याबरोबर स्पर्धा करण्यास मी मुळींच माघार घेतली नसती. हीं अन्योन्यचुंबनें, पाहा, आपणाला एकमेकांच्या विचा-रांशीं कशीं समरस करून टाकीत आहेत तीं. आपले हे विचारविनिमय चालतात ते शब्दानें नसून स्पर्शेंद्रि-याच्या द्वारें होत आहेत. तथापि तुझ्या भाषेंत निष्णात होईपर्यंत तुला सोडून मी नामर्दासारखा पळून जाईन,' अशी लाडके, मनांत शंका सुद्धां आणूं नकोस. कारण तुझ्या शाब्दिक भाषेचें जरी मला रहस्य समजत नाहीं, तरी ती तुझ्या मुखांतून बाहेर पडत असल्यानें मला ती वसंतऋतूमध्यें लतामंडपाखालीं सतार छेडीत बसलेल्या सुंदर युवतीच्या कर्णरंजित गीतालापाप्रमाणें गोड लागत आहे.' या उताऱ्यावरून भावनाप्रदर्श-नाच्या कामीं केवळ शब्दच उपयोगी आहेत हें म्हणणें निरर्थक ठरतें. शब्द आणि हावभावादि साधनें यांची स्पष्टार्थत्वाच्या बाबतींत अत्यंत आवश्यकता आहे हें जरी खरें आहे, तरी शब्द किंवा शब्देतर यांपैकीं दुसऱ्याचाच जास्त उपयोग होतो. उलट असेंही दाखवितां येईल कीं, ज्या ठिकाणीं नुसत्या शब्दावर सारी भिस्त ठेवली जाते, त्या ठिकाणीं कार्यभाग साधण्यापेक्षां कार्यनाश अधिक झाल्यावांचून राहत नाहीं. शब्दावर सारी भिस्त ठेवल्यामुळें उडालेल्या घोटाळ्याची करुणास्पद स्थिति तुकारामानें आपल्या एका अभंगांत खुबीदार शब्दानें वर्णिली आहे.

'कानडीनें केला मराठा भ्रतार ।
एकाचें उत्तर एका न ये।।
तिनें पाचारिलें 'इल बा' म्हणोन ।
येरू पळे, आण झाली आतां ॥'

मराठी बोलणारा पति व कानडी बोलणारी बायको अशी मासलेवाईक जोडी जमल्यावर बायकोच्या 'इल बा' म्हणजे 'इकडे या' या म्हणण्याचा अर्थ नवऱ्यानें 'बा' म्हणजे 'बाबा' अर्थात् बायकोनें आपणाला उद्देशून पितृपणाची शपथ घेतली असें जाणून तो तिच्यापासून दूर पळूं लागला! भिन्नभाषिकांचा असला घोटाळा होणें स्वाभाविक आहे. याचें मुख्य कारण हें कीं, दोघांनींही विशिष्ट भाषेंतील नुसत्या शब्दावर सारा भरंवसा ठेवला. त्यांत शब्देतर सर्वसामान्य भाषेचें बिलकुल अंग नाहीं. लहान लहान मुलें बोलतांना सामान्य भाषेचा अवलंब करतात. आणि मूल नुकतेंच कोठें शब्द उच्चारूं लागलें म्हणजे तर तें आपल्याजवळील शब्दसंग्रहाच्या तुटपुंज्या साधनावर मनांतील गोष्टींचा स्पष्ट उलगडा करण्यामध्यें इतका कांहीं चमत्कार करून दाखवितें कीं, तसें करणें सबंध कोषच्या कोष



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
अनुक्रमणिका

पाठ असणाऱ्या महापंडिताला सुद्धां साधत नाहीं.*

पण उलट या पंडितांच्या जिभेवरील शब्दांचा भार जेव्हां हळू हळू हलका होऊं लागतो, तेव्हां मुलें व सूक्ष्मबुद्धीचे लोक यांच्याप्रमाणें त्यांलाही आपल्या मनांतील भाव सफाईनें प्रगट करण्याची शक्ति येते. प्रत्येक मनुष्याचे आपल्या प्रियपत्नीचें नांव उच्चारण्याचे हजारों प्रकार असतात, व त्यांपैकीं प्रत्येक प्रकार इतका नमुनेदार असतो कीं, तो जणूं काय बोलण्यांतील लघुलिपिच आहे असा भास होतो. त्या मनुष्याची पत्नीही पण तितक्याच प्रकारानें त्याला उत्तर देते. शब्दांचा भरणा इतका थोडका असतांना व तोही मोठ्या कंजूषपणानें उपयोगांत आणून, त्यांच्यामधील भाषण इतकें निर्वेधपणें कसें चालतें याचा खरोखर अचंबा वाटतो. हीच दृष्टि ठेवून आपण जर आपल्या स्वतःचें निरीक्षण केलें तर मनाचा—नव्हे आत्म्याचा—शब्दकोष किती प्रचंड आहे व त्यांत किती विविधता आहे, हें पाहून आपण चकितच होऊन जाऊं.

आंग्ल कवि वर्ड्स्वर्थनें म्हटल्याप्रमाणें, मुलें म्हणजे परमात्म्याचीं खरीं प्रतिबिंबें होत. त्यांच्या मुखांतून निघणाऱ्या शब्दांत जिवंतपणा भरलेला असतो. मुलांच्याच जोडीला सृष्टयुपासक कवींनाही बसवावयास हरकत नाहीं. सामान्य लोक सुद्धां गांभीर्यपूर्ण वृत्तीमध्यें जी भाषा बोलतात ती वायफळपणाच्या दोषापासून अगदीं अलिप्त असते. लहानपणीं शब्दांत दिसणारा जिवंतपणा पुढें मोठेपणीं न दिसण्याचें कारण मनुष्याची लोभाविष्ट स्थिति होय. या लोकांच्या हातांत शब्द सांपडून 'नरें मळविलें अहह ! तेज तें पूर्वीं होतें जें त्यांत' अशी त्यांची निर्माल्यवत् अवस्था झाली असल्याबद्दल 'केशवसुतां'ना फार खेद वाटत आहे. जगामध्यें नित्यशः चालणाऱ्या असंख्य घडामोडी जर वरील तत्वावर चालल्या असत्या, त्यांच्यांतील गांभीर्य जर तसेंच राहिलें असतें, तर पांडित्यपूर्ण किंवा शब्दकोषगत अर्थ दर्शविणारी भाषाही निरर्थक न होतां आरंभाप्रमाणें अर्थबोधक राहिली असती, तिच्यांतील अरेरावी वृत्तींचा सहज लोप झाला असता, व तिच्या जीवितावर उठलेल्या चळवळीचा मुळीं प्रादुर्भावही झाला नसता.

भाषेविरुद्ध चाललेल्या चळवळीवरून पाहतां ही गोष्ट स्पष्ट होते कीं, आपल्या मनांतला आशय दुसऱ्याच्या मनांत पूर्णपणें बिंबविण्याचे कामीं भाषेच्या ऐवजीं विशिष्ट खुणा अगर चिन्हें यांचा जरी चांगला उपयोग होत असला, व त्यांपासून जरी चमत्कृतिमय परिणाम घडून आले असले, तरी तो मार्ग खरोखर अस्वाभाविक असून वस्तुस्थितीचें चित्र हुबेहूब रंगविण्याच्या बाबतींत निरुपयोगी आहे. महाराष्ट्रइतिहाससंशोधक व भाषासमाजशास्त्री रा. वि. का. राजवाडे यांनीं अक्षरपूर्वकालीन भाषेचे जे प्रकार *

* यासंबंधीं बाबू महाशय रवींद्रनाथ ठाकूर यांच्या 'जीवनस्मृतीं'तील समानार्थक उतारा लक्षांत ठेवण्यासारखा आहे. 'साधनसामुग्री भरपूर असते तेव्हां मनाला मांद्य येतें, व प्रत्येक गोष्टीसाठीं मन तिच्यावरच अवलंबून असतें. आनंदाचा पूर्ण उपभोग मिळण्याच्या कामीं बाह्य सामुग्रीपेक्षां अंतर्गत सामुग्रीचेंच महत्त्व विशेष असतें, याचा मनाला विसर पडतो. मनुष्याच्या बाल्यावस्थेंत त्याच्या मालकीच्या वस्तु थोड्या व क्षुल्लक असतात. तरी सुखप्राप्तीकरितां त्याला अधिकाची जरूरी भासत नाहीं. जो दुर्दैवी मुलगा खेळण्याच्या असंख्य वस्तूंखालीं दडपून गेलेला असतो त्याला त्यापासून कांहींच सुख होत नाहीं.'

* हे प्रकार कोणकोणते असावेत याची चिकित्सा रा. राजवाडे यांनीं आपल्या 'विकारविचारप्रदर्शनाच्या साधनांची उत्क्रांति' या संशोधनात्मक निबंधांत केली आहे. त्याचा गोषवारा आम्ही खालीं देत आहों:—

'नवीन पदार्थदर्शक ध्वनींचा सांठा हाच मनुष्याचा पहिला शब्दकोष होय. भाषा म्हणजे मुखांतून निघूं शकणाऱ्या शब्दांनीं क्रियांचें व पदार्थांचें आविष्करण करण्याची कला. तथापि ध्वनियुक्त पदार्थ व क्रिया यांचें ज्ञान जसें अनुकरणात्मक ध्वनीनें झालें तसें अध्वनि वस्तूंचें व क्रियांचें प्रदर्शन हावभावानें होऊं लागलें. यापुढील प्रगति म्हणजे अध्वनि पदार्थांना व क्रियांना अध्वनि पदार्थांच्या व क्रियांच्या आधारानें नांवें देणें ही होय. नंतर गुणींच्या ध्वनीवरून गुणांना नांवें देण्याचा नवीन शोध लागल्यानें अध्वनि साध्या



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

अनुक्रमणिका

वर्णिले आहेत त्यांपैकीं, अगर दुसरा कोणता तरी, एक प्रकार अक्षरांचा शोध लागण्यापूर्वी समाजांत प्रचलित असून तो पुढें त्या शोधानंतर लयास गेला असला पाहिजे हें खास. भाषेविरुद्ध उठलेल्या बंडाचा उद्देश तरी, तो वस्तुतः पूर्वकालीन अज्ञात प्रकार पुन्हां प्रचारांत आणणें, हा होय. अक्षरांचा शोध लागल्यामुळें मनुष्यजातीचा अभ्युदय होऊं लागला, पण त्याबरोबर तिच्या पतनासही प्रारंभ झाला. भाषेचा नायनाट करण्याविषयींची चळवळ म्हणजे एक प्रकारें क्रांति, पुनरुज्जीवन किंवा पूर्व स्थितिस्थापकतेचा प्रयत्न होय. या चळवळी-वरून जगांतील सुधारणा चुकीच्या आडमार्गास लागली आहे, व उत्क्रांतीचा मध्यबिंदु गांठण्याच्या शर्यतींत कांहीं बाबतींत तरी मनुष्यापेक्षां पक्ष्यांनीं–म्हणजे मनुष्येतर प्राण्यांनींच–जास्त शाणाक्षपणा दाखविला आहे, ही गोष्ट सिद्ध होते.

ज्यावेळीं मनुष्याचा हरएक प्रकारचा व्यवहार हावभाव आणि ध्वनि या साधनद्वयावर सर्वस्वीं अवलंबून होता. त्यावेळीं त्यांतील चैतन्य व नाटकी थाटमाट हे गुण लय पावण्याची मुळींच भीति नव्हती. पुढें तीं साधनें लोपून त्या ऐवजीं समाजांत लिपी ऊर्फ लेखनाच्या खुणा रूढ झाल्या. तथापि जोंपर्यंत त्या खुणांच्या आकारांत मूळचें सांकेतिक स्वरूप किंवा

---

[ टीप मागील पृष्ठावरून ]

रंगांनाही नांवें मिळूं लागलीं. सार्थ ध्वनि एकापुढें एक काढणें हीच प्राथमिक भाषणशैली. ही वैदिक भाषेलाही पंचवीस तीस पिढ्यांनीं पूर्वज आहे. ही भाषा अप्रत्यय होती व तिनें अर्धामुर्धाच अर्थ दर्शविला जाई. बाकी राहिलेला अर्थ अंगविक्षेपांनीं पूर्ण केला जात असे. नंतर लिंग,–भेद,–प्रत्ययोपसर्गादींची निर्मिति होऊन वैदिक भाषा, तिच्यापासून किंवा तिच्या बहिणीपासून जुनी महाराष्ट्री वगैरेंची परंपरा लागून अर्वाचीन मराठी उदयास आली. पृथ्वीवरील इतर भाषांच्याही अशाच ध्वनिपरंपरा दाखवितां येतील. ध्वनिसाधनाशिवाय विचारप्रदर्शक दुसरीं साधनें रंगीत व कोरींव रेखाचित्रें होत. रेखाचित्रांतील चित्रें जाऊन नुसत्या रेघा राहिल्या व त्याच शब्दांच्या बोधक म्हणजे अक्षरें बनल्या. शेवटीं ज्या साध्या ध्वनींचे शब्दावयव बनलेले असतात त्या साध्या ध्वनींच्या दर्शक अशा खुणा म्हणजे 'मातृका' (न बदलणाऱ्या कायमच्या खुणा) अस्तित्वांत आल्या. हावभाव ऊर्फ विक्षेप या तिसऱ्या साधनाची प्राथमिक मनुष्यांत जी स्थिति होती तीच स्थिति सध्यांही आहे. भाषा व अक्षरें यांच्या प्रगतीमुळें या अंगाची सुधारणा झाली नाहीं; व पहिल्यापासून विचारप्रदर्शनाचें जें काम होतें तें करण्याची या साधनाची क्षमता नाहीं. तथापि बोलण्याला पोषक दुजोरा म्हणून याही विचारप्रदर्शनाच्या कामीं, व भाषा आणि अक्षरें यांनीं जे विचार व विकार प्रदर्शित करतां येणें मुष्कीलीचें आहे ते दाखविण्याचे कामीं, हावभाव या साधनाचा मनुष्यप्राणी अतिशय उपयोग करीत आलेला आहे, व त्यास त्यानें व्यवहारक्षमताही आणलेली आहे. अनुकरणात्मक ध्वनीचें भाषा, अनुकरणात्मक रेघांचें अक्षर हें जसें परिणत व कृत्रिम स्वरूप आहे तसेंच अभिनय हें अनुकरणात्मक विक्षेपांचें परिणत व कृत्रिम स्वरूप आहे. वरील तीन साधनांशिवाय तितकेंच जुनें असें अनुकरणात्मक चौथें साधन म्हटलें म्हणजे आकृति हें होय. येणेंप्रमाणें (१) ध्वनीपासून भाषा, (२) रंगीत किंवा साध्या रेखाचित्रापासून अक्षरमालिका, (३) नैसर्गिक हावभावापासून कृत्रिम अभिनय, (४) पाहिलेल्या आकृतीपासून बनावट भांडीं, अशा चार कृत्रिम व्यावहारिक कला मनुष्यानें संपादिल्या.

या चारी साधनांचें ज्याप्रमाणें व्यावहारिक स्वरूप आहे त्याप्रमाणें त्यांना अतिशय ऊर्फ तीव्र स्वरूप प्राप्त होतें. या दोन्ही स्वरूपांचें मिश्रण होऊन तिसरें एक नवीन साधन बनतें. या शिवाय काव्याचें वाद्य हें जसें बाह्यतः साधन आहे तसेंच प्रत्येक साधनाला बाह्य कलेची जोड लागते. अशा रीतीनें हीं वीस साधनें होतात. पण हीं सगळीं वास्तव ऊर्फ शुद्ध साधनें होत. त्याच्याच जोडीला आणखी वीस भ्रांत ऊर्फ शबल साधनें आणलीं म्हणजे सगळ्या साधनांची संख्या चाळीस भरते. विचार व विकार व्यक्त होण्याला या सर्व साधनांचा मनुष्याला उपयोग होतो.

"इतिहास आणि ऐतिहासिक."




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

उच्चारांत अनुकरणशीलता हीं व्यक्त होत आहेत, तोंपर्यंतसुद्धां वरील गुण नष्ट होतील, अशी फारशी भीति बाळगावयास नको.

खुणांचा अगर लिपीचा अस्वाभाविक उपाय अजिबात नाहींसा करण्यापेक्षां तिचा निकाल अन्य तऱ्हेनें लावतां येईल. सबब भाषेचा उच्छेद करणारी ही चळवळ 'मूले कुठारः' इतक्या परमावधीला पोंचली नाहीं तरी हरकत नाहीं. त्या चळवळीच्या मूळ उद्देशाचें नीट परीक्षण केलें तर आपणाला असें आढळून येईल कीं, केवळ शब्दांचा नायनाट करण्यासाठींच तिचा उद्भव झाला नसून शब्दाचे जे दोन प्रकार आहेत त्यांपैकीं प्रत्येक प्रकाराच्या भिन्नभिन्न कार्यस्वरूपामधील घोटाळा काढून टाकण्याविषयीं त्या चळवळीचा मुख्य कटाक्ष आहे. शब्दाचे हे दोन प्रकार म्हणजे एका बाजूला पदार्थ आणि क्रिया यांपासून उत्पन्न झालेले, रहस्यपूर्ण भासणारे, जीवनाचे अंशभूत होणारे व अशा रीतीनें खरीखुरी अद्भुत व उत्पादक शक्ति अंगीं बाणणारे सजीव शब्द, तर दुसऱ्या बाजूला बीजगणितांतील किंवा इतर शास्त्रीय विषयांतील पारिभाषिक चिन्हांप्रमाणें बुद्धिसामर्थ्यानें ओढून ताणून बनविलेलीं निर्जीव साधनें होत.

शब्दाच्या या दोन भिन्नस्वरूपांमध्यें, म्हणजे उत्पादक ऊर्फ सजीव भाषा व बौद्धिक ऊर्फ निर्जीव भाषा, यांमध्यें जो एक प्रकारचा स्वाभाविक पण घातुक गोंधळ माजत असतो तोच खरोखर मनुष्याच्या बऱ्याचशा दुःखकारक पराधीनतेला जबाबदार आहे. याच कारणामुळें जगांतील बौद्धिक, मानसिक, आत्मिक वगैरे सर्व प्रकारच्या गुलामगिऱ्या उत्पन्न झाल्या आहेत. मनुष्यमात्राला खरोखर जखडून टाकण्याइतका जर एकादा खंबीर दोरखंड असेल तर तो अनुत्पादक अथवा वांझ शब्दांचा पीळ भरून तयार झालेला दोरखंड होय. त्या कामीं या दोरखंडाचा जितका उपयोग होतो तितका दुसऱ्या कशाचाही होत नाहीं. बाकीचे दोर यापुढें केवळ वाळूचे बनविलेले भासतात. राजा असो कीं धनाढ्य असो, धर्मगुरु असो कीं महापंडित असो, इतकेंच काय, पण शब्दाचा कीस काढणारा कायदेशास्त्री असो कीं तत्त्ववेत्ता असो, हे ज्या शाब्दिक जालानें हजारों जणांना गोत्यांत आणतात तें जाळें जर तुटून गेलें तर त्यांचें जनतेवरील वजन ढांसळून जाण्यास एका क्षणाचाही विलंब लागणार नाहीं.

हें शाब्दिक जाळें तुटून जात आहे. वांझ व गतिहीन भाषेची हकालपट्टी चालू आहे. आणि मनुष्याला आपल्या स्वभावांतील उत्कृष्ट गुणांचा विकास करणारा भाग व केवळ बुद्धिजन्य हिणकस भाग यांमधील भेद ओळखतां येऊं लागेपर्यंत ती तशीच पुढें चालणार. अशा रीतीनें ज्या वेळीं त्या अधम भागाचा पुरता लोप होऊन जाईल, त्या वेळीं चिरकालिक बौद्धिक गुलामगिरीच्या व दुसऱ्यांना गोत्यांत आणूं पाहणाऱ्या स्वैर वृत्तीच्या संधिप्रकाशाचा एकदमच नायनाट होईल, हें सांगणें नको!




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

# पुस्तक-परीक्षा.

## १. " सौंदर्य आणि ललितकला. "

### ' सौंदर्य. '

सौंदर्य हें काय आहे व कशाला सौंदर्य म्हणावें, याबद्दल जरी मोठमोठ्या विद्वानांमध्यें व तत्त्ववेत्त्यांमध्यें तीव्र मतभेद असला, व एकानें केलेलीं सौंदर्याचीं लक्षणें जरी तंतोतंत दुसऱ्यास पसंत न पडलीं, तथापि ' **सौंदर्य** ' म्हणून कांहीं अजब व अवर्णनीय कल्पना आहे, व ती मानवी जीवनावर बरीच सत्ता गाजवीत आहे, याबद्दल मात्र कोणाचाही मतभेद होणें शक्य नाहीं.

कोणी विनोदानें म्हणतात कीं, '**सौंदर्या**'-च्या योगानें साधूंच्या किंवा वेड्यांच्या मनावर मात्र परिणाम होत नाहीं. पण वस्तुतः ही गोष्ट खरी नव्हे. ' सुभाषित, संगीत, व युवतींच्या लीला, यांच्या योगानें ज्याचें मन द्रवत नाहीं, तो मुक्त असेल किंवा पशु तरी असेल, ' असें सुभाषितकार म्हणतात. पण हें म्हणणें सुभाषितांतच शोभतें ! याचें कारण असें कीं, साधूंचें मन जरी वरील गोष्टींमुळें द्रवलें नाहीं, तथापि त्याला सुभाषित, संगीत आदिकांमधला रस समजतच नाहीं, असें मात्र म्हणतां येणार नाहीं. स्त्रीचें सौंदर्य साधूला किंवा जीवन्मुक्ताला समजतच नाहीं असें नाहीं. साधारण मनुष्य त्या सौंदर्याकडे स्थूल दृष्टीनें पाहील, मोहून गुंग होईल, व फसेल; पण साधु त्याच सौंदर्याकडे उच्च आत्मिक दृष्टीनें पाहील, आत्मिक शक्तीची कल्पना करील, व आत्म्याच्या स्वरूपाच्या चिंतनानें तल्लीन होईल. साधारण अज्ञानी मनुष्य ज्या सौंदर्याच्या ध्यासानें गुंग होऊन मोहून फसतो, त्याच सौंदर्याच्या निदिध्यासानें दृष्टिकोन बदलल्यामुळें साधु तरून जातो दोघांचा दृष्टिकोन भिन्न असल्यामुळें हा असा भिन्न परिणाम होतो, म्हणून प्राकृत माणसाला सौंदर्य समजतें व साधूला तें कळत नाहीं, असें नसून, उलट सौंदर्यांतील खरा रस साधूलाच समजतो, इतरांस तो समजतच नाहीं, हें मात्र अगदीं खरें आहे.

वेड्याला सौंदर्य समजतें कीं नाहीं, हा मात्र फारच भानगडीचा प्रश्न आहे. पण जे सौंदर्याला भुलूनच वेडे झालेले असतात, त्यांना त्या सौंदर्याचेंच भान सदोदित होत असतें. तेव्हां कांहीं वेड्यांना तरी सौंदर्याची भावना होत असावी, असें म्हटलें तर तें सत्यास सोडून होईल असें नाहीं. एका वेड्याला जर तें समजतें तर तें इतरांस कां समजत नसावें, याचें सयुक्तिक कारण कोणीही सांगूं शकणार नाहीं; फार तर असें म्हटलें जाईल कीं, सौंदर्यापासून होणारा आल्हाद जसा शहाण्याला होईल तसा तो वेड्याला होणार नाहीं. पण सोपपत्तिक व शास्त्रोक्त रीतीनें सौंदर्याला जाणणें हेंच जर शहाणपणाचें लक्षण केलें तर बहुतेकांना वेड्यांतच समाविष्ट व्हावें लागेल; कारण सौंदर्यविषयक व्याख्या ज्या ज्या थोर थोर तत्त्ववेत्त्यांनीं केलेल्या आहेत, त्यांप्रमाणें सौंदर्याची सुसंकृत कल्पना करून नंतर त्यांतील रस घेणारे कोणी असतील ते असोत, साधारण जनता तर व्याख्यांचा विचार न करतां व तत्वज्ञान्यांच्या मतांचा कीस न काढतां आपल्या आवडीप्रमाणें अमुक सौंदर्य आहे असें ठरवूनच आनंद मानीत असते.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

अनुक्रमणिका

वास्तविक पाहतां जगतांत वेड्यांचीच संख्या अधिक भरेल, असें '**वेडेपणाच्या शास्त्रा**'चा ज्यांनीं सांगोपांग व्यासंग केला आहे त्यांनीं ठरविलें आहे. बहुजनसमाजाशीं ज्या एका व्यक्तीचें मुळींच जमेनासें होतें, त्या दुर्दैवी माणसालाच '**वेडा**' ही पदवी सर्वांकडून देण्यांत येते. यद्यपि लोकांनीं त्याला ही पदवी दिली, तथापि त्या पदवीचा स्वीकार न करण्याइतकें शहाणपण मात्र त्याच्यामध्यें खास असतें! तात्पर्य, वेड्यामध्येंही थोडेंसें शहाणपण असतें, व शहाण्यांमध्येंही थोडेंसें वेडेपण असतेंच असतें. यासाठीं शहाण्यांची सौंदर्याची कल्पना जरी वेडयांना पसंत नसली, तरी त्या बिचाऱ्या सर्वांचें एकमत व त्यांचें जगांत बहुमत होत नाहीं, म्हणूनच केवळ त्यांना सौंदर्य समजतच नाहीं, असें म्हणणें केव्हांही योग्य ठरणार नाहीं.

वेडयांना सौंदर्य समजो किंवा न समजो, त्या सर्वांचें या विषयासंबंधानें एकमत होईयेंत हा वाद आपण जरी बाजूला ठेवला, तरी आपणास शहाणें समजणारांचें तरी या विषयावर अगदीं एकमतच आहे असें कांहीं नाहीं. साधुवर्य तुकाराम महाराजांनीं विठोबाच्या मूर्तीला '**सुंदर तें ध्यान**' म्हटलें व त्या मूर्तीच्या ठिकाणीं सौंदर्याचा अनुभव घेतला; पण एकादा आधुनिक मूर्तिशास्त्रप्रवीण मूर्तिकार त्या मूर्तीमध्यें सौंदर्य आहे असें कधींही म्हणणार नाहीं. हिंदी चित्रकलेप्रमाणें सशास्त्र काढलेल्या चित्रामधील सौंदर्य युरोपियन चित्रकारांना मुळींच कळत नाहीं. याचप्रमाणें शिद्यांची सौंदर्याची कल्पना व युरोपियनांची सौंदर्याची कल्पना जशी भिन्न असते,त्याचप्रमाणें हिंदी व जपानी सौंदर्यामध्येंही महदंतर असतें. तात्पर्य, शहाण्यांमध्येंही सौंदर्यविषयक कल्पनांच्या संबंधानें एकवाक्यता नाहीं.

कल्पनांच्या भिन्नत्वांमधून एका सजीव भावनेची जाणीव उत्पन्न करून देणें व ती मोठमोठ्या हट्टी शहाण्यांसही मानावयास लावणें हें काम '**शास्त्रा**'चें आहे. ज्या ज्या विषयांचीं शास्त्रें बनलीं आहेत, व महान् महान् धुरंधर विवेचकांनीं आपलीं डोकीं शिणवून ज्या ज्या शास्त्रांना सुनियमांनीं संबद्ध केलें आहे, त्या विषयांसंबंधानें माजलेला पूर्वीचा मतभेद मावळावयास लागला आहे व नियमबद्ध विचारसरणीचा उदय होऊं लागलेला आहे. '**सौंदर्या**'-संबंधानेंही जरूर असें एखादें शास्त्र असतें तर त्याबद्दल सुद्धां सध्यांप्रमाणें फारसा मतभेद दिसून आला नसता. युरोपच्या भाषांमध्यें '**सौंदर्या**'चा ऊहापोह करणारीं बरींच पुस्तकें प्रसिद्ध झालेलीं आहेत, व '**सौंदर्यशास्त्र**' या नांवाचें एक शास्त्र तेथेंही जन्मास आलेलें आहे. पण युरोपची विचारसरणी व हिंदी विचारसरणी यांत जमीनअस्मानाइतकें अफाट अंतर असल्यामुळें युरोपच्या वातावरणांत जन्मास आलेल्या सौंदर्यशास्त्रांतील सर्वच कल्पना पूर्वेकडील आर्यांना जशाच्या तशाच पसंत पडतील, हें संभवनीयच नाहीं. गायन, चित्र, मूर्ति, वैद्यक, तत्त्वज्ञान वगैरे शास्त्रांबद्दल पूर्वेकडच्या व पश्चिमेकडच्या कल्पना जशा जुळत नाहींत,त्याचप्रमाणें सौंदर्यविषयक कल्पनांविषयींही मतभेद होणें अगदीं साहजिकच आहे. जेथें पाहण्याचा दृष्टिकोनच निराळा तेथें दिसणारें दृश्यही निराळेंच असणार हें उघड आहे.

पण पूर्वेकडील आर्यांच्या वाङ्मयामध्यें सौंदर्यशास्त्रावर एखादा सुसंबद्ध प्रमाणग्रंथ अजून उपलब्ध झाला नाहीं. त्यामुळें पूर्वेच्या व पश्चिमेच्या सौंदर्यशास्त्रांची तुलना सध्यां तरी करतां येणें शक्य दिसत नाहीं. हिंदुस्थानाच्या एवढया अवाढव्य वाङ्मयविस्तारामध्यें सौंदर्यशास्त्रावर स्वतंत्र ग्रंथ उपलब्ध नाहीं, मग तो



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

अनुक्रमणिका

मराठीमध्यें नसला तर त्यांत काय आश्चर्य आहे ? आश्चर्य असो वा नसो, ही एक उणीव आहे, यांत तिलप्राय शंका नाहीं. ही उणीव अंशतः दूर करण्याचें श्रेय आमचे मित्र रा. **वासुदेव गोविंद आपटे** यांनीं पटकावलें आहे, याबद्दल त्यांचा गौरव करावा तेवढा थोडाच आहे. त्यांनीं नुकतेंच प्रसिद्ध केलेलें पुस्तक " **सौंदर्य आणि ललितकला** " हें महाराष्ट्रीय जनतेपुढें आलेलें आहे; आणि हें जरी या विषयावर मराठी भाषेमध्यें अगदीं पहिलेंच पुस्तक असलें, तथापि या विषयावरील बरीच संग्राह्य व महत्त्वाची माहिती यांत संग्रहीत झालेली असल्यामुळें हें पुस्तक '**सौंदर्य व ललितकला**' या विषयांवरील जगांतील थोर थोर महानुभावांचे विचार सूत्ररूपानें पण सुबोधपणानें महाराष्ट्रीयांच्या अंतःकरणांत बिंबवण्यास कारणीभूत होईल, यांत मुळींच शंका नाहीं.

रा. वासुदेवरावांच्या अंतःकरणामध्यें आर्यांच्या विचारसरणीचा लख्ख उजेड पडला असल्यामुळें युरोपियन विचारसरणीमधील विरोध त्यांना सहज व्यक्त करतां येतो, व पूर्वेकडील तात्त्विक कल्पनांतील रहस्याचा त्यांना नीट उमज झाला असल्यामुळें पाश्चात्यांच्या विधानांतील स्थूल दृष्टीचा त्यांना लीलेनें निषेध करतां येतो. यामुळें या पुस्तकांतील कित्येक प्रसंगांतील लेख, खरोखरच, आर्य संस्कृतीची उज्ज्वलता वाचकांच्या मनांत ठसवण्यास समर्थ झालेले आहेत. त्यांतील एका प्रसंगाबद्दल या ठिकाणीं थोडेंसें लिहिलें तर तें अप्रासंगिक होणार नाहीं. 'विश्वरचनेंतील सौंदर्य या विषयावर जगांतल्या प्राचीनतम संस्कृत वाङ्मयांत काय माहिती उपलब्ध आहे?' असा प्रश्न प्रो. मोक्षमुलर साहेबांस सुप्रसिद्ध जर्मन तत्त्वज्ञानी हॅम्बोल्ट यांनीं केला; त्यावर प्रो. मोक्षमुलर साहेबांनीं उत्तर दिलें कीं, "हिंदु मनामध्यें सृष्टिविषयक सौंदर्याची कल्पनाच नाहीं. त्यांच्या मानवी सौंदर्याच्या वर्णनाबद्दलही तोच प्रकार आहे. ते जरी कांहीं भागांचें वर्णन करतात तरी सृष्टीमध्यें सौंदर्य म्हणून कांहीं आहे, ही जाणीवच त्यांना नाहीं. मूर्तिकृति व चित्रकला यांमध्यें हिंदूंची फारशी प्रगति नाहींच.········ हें खरोखरच आश्चर्यच आहे कीं हिंदू तत्त्वज्ञान्यांसारख्या अज्ञेयाच्या तर्कामध्यें तल्लीन झालेल्यांनीं सुद्धां सौंदर्याच्या संवेदनांसंबंधानें आपले सारभूत विचार संग्रहित करून ठेवूं नयेत ! " या प्रो. मोक्षमुलरांच्या विधानाबद्दल आमचे वासुदेवराव लिहितात –" येवढया जाडया संस्कृत विद्यापारंगत विद्वानानें असा अभिप्राय दिल्यावर तो वेदवाक्य समजून इतर पाश्चात्य विद्वानांनीं त्याच मताचा अनुवाद केला तर त्यांत आश्चर्य नाहीं. आश्चर्य हें आहे कीं, मॅक्समूलरासारख्या पंडितांनीं आमच्या संस्कृत वाङ्मयाचें वर वर अध्ययन करून विचार न करतां वरच्यासारखें मत बेधडक देऊन मोकळें व्हावें..... भरतभूमि ही ललितकलांची जन्मभूमि आहे. अशा ठिकाणीं ललित कलांचें जीवित जें सौंदर्य त्याविषयीं कधीं कोणीं विचारच केला नाहीं, त्यावांचूनच ललित कला उदयास आल्या व उत्कर्ष पावल्या, हें संभवनीय तरी कसें वाटावें ?"

ग्रंथकर्त्याच्या अंतःकरणामध्यें हिंदी ललित कलांविषयीं जो श्रेष्ठ आदर वसत आहे, त्याचें वरील वाक्यांत उत्तम प्रतिबिंब पडलेलें आहे. अशा प्रकारच्या सहृदय लेखकाकडून हें पुस्तक लिहिलें गेलें आहे, त्यावरून याची योग्यता सहजच ध्यानीं येणार आहे प्रो. मॅक्समूलरांच्या वरील अविचारी विधानांचें खंडन ग्रंथकर्त्यांनीं '**सौंदर्या**' वरील निबंधाच्या चवथ्या



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

अनुक्रमणिका

प्रकरणांत श्रुति, स्मृति, उपनिषद् आदि ग्रंथांतील अनेक आधार देऊन केलें आहेच. त्यावरून सौंदर्याची कल्पना आर्य वाङ्मयांत आहे, असें परंपरेनें ठरण्यासारखेंही आहे. पण या ठिकाणीं सौंदर्याची साक्षात् कल्पना बठवून दाखवणारे आधार दिले गेले असते तर फार बरें झालें असतें, असें वाटतें. सौंदर्यविषयक साक्षात् कल्पनांचा ज्या वचनांमध्यें उल्लेख आहे त्यांपैकीं चार दोन वचनें येथें दिल्यास वावगें होणार नाहीं असें समजून तीं खालीं देत आहें. परमेश्वराची भक्तीनें प्रार्थना करावयाच्या वेदमंत्रामध्यें आणलेलें पुढील वाक्य पाहण्यासारखें आहे—

**सुरूपकृत्नुमूर्तये०॥** ऋ. १।४।१।

" आमच्या संरक्षणासाठीं उत्तम सौंदर्याचे आकार करणाऱ्या ईश्वराचें स्तवन करतों. " या मंत्रांतील '**सु-रूप-कृत्नु**' हा शब्द फारच महत्त्वाचा आहे. '**रूप**' शब्दाचाच अर्थ '**सुंदर आकार**' असा आहे. ज्या प्रमाणें '**गुणी**' शब्दाचा अर्थ 'सद्गुणी' असा होतो, त्याचप्रमाणें '**रूपवान्**' शब्दाचा अर्थ 'सुंदर आकृतीनें युक्त' असा होत असतो. नुसत्या 'रूप' शब्दांतील सौंदर्याला आणखी खुलवण्यासाठीं वरील मंत्रामध्यें '**सुरूप**' असा शब्द वापरला आहे. माणसांतील कारागीर 'रूप' बनवूं शकतात. रूप बनवणें म्हणजे सुंदर आकार बनवणें हें माणसांना सुद्धां शक्य आहे. पण परमेश्वर जी सृष्टि बनवितो ती '**सुरूप**, अर्थात् 'अत्यंत अप्रतिम सौंदर्यानें युक्त' असते. 'रूप' व 'सु-रूप' यांमध्यें हा असा फरक आहे. परमेश्वर '**सु-रूप-कृत्नु**' आहे, म्हणजे तो अत्यंत सौंदर्यानें परिपूर्ण असे आकार या सृष्टींत बनवतो, ही भक्ताची खात्री आहे. ही खात्री होण्यास सृष्टींतील प्रत्येक वस्तूंमधील अत्यंत अद्भुत सौंदर्य प्रत्ययास येणें आवश्यक आहे. परंतु प्रो. मोक्षमुल्लर साहेब म्हणतात कीं, "हिंदूंच्या मनांत सृष्टिविषयक सौंदर्याची कल्पनाच नाहीं. ( The idea of the beautiful in Nature did not exist in the Hindu mind.) " ज्यांना सृष्टीमध्यें सौंदर्याचा अनुभवच होत नाहीं ते आपल्या उपास्य ईश्वराला 'अत्यंत सुंदर आकार बनवणारा' असें कसें म्हणूं शकतील बरें ? सृष्टीमध्यें सौंदर्य आहे अशी जाणीव व्हावी, त्यांतील अप्रतिमपणा अनुभवास यावा, तो सौंदर्याचा अप्रतिमपणा साधारण शक्तीकडून बनणार नाहीं अशी खात्री व्हावी, तेव्हांच कवि आपल्या ईश्वराला 'अत्यंत सुंदर आकार बनवणारा' असें म्हणेल. पण वेदाध्ययनामध्यें पारंगत झालेले प्रो. मोक्षमुल्लर साहेब तर म्हणतात कीं 'हिंदु मनांत सौंदर्याची जाणीवच नाहीं !!!'

तसेंच आणखी पाहा—

**'इंद्रो राजा जगतश्चर्षणीनां**
**अधि क्षमि विषुरूपं यदस्ति॥** ऋ. ७।२७।३.

" या जगतांत विशेष सौंदर्याचें जें रूप आहे त्या सर्व जगताचा इंद्र हाच एक राजा आहे. " पूर्वीच्या '**सुरूप**' शब्दापेक्षांही हा '**वि-सु-रूप**' शब्द अत्यंत बहारीचा आहे. 'विशेष सुंदर असा सौंदर्याचा आकार' असा वरील शब्दाचा भाव आहे. या जगतामध्यें जें जें कांहीं विशेष सुंदर आहे, त्या सर्वांचा परमेश्वराकडे संबंध या मंत्रानें जोडला आहे. या शब्दामधील हृद्गत ज्यांना कळलें असेल, ते हे मंत्र गाणाऱ्यांना सृष्टींतील विशेष सौंदर्याचा जाणावच झाली नव्हती, असें कसें म्हणूं शकतील बरें ? तसेंच—

**यः सरूपा विरूपा एकरूपाः॥**ऋ.१०।१६९।२.

या मंत्रांतील '**स-रूप, वि-रूप, एक-रूप**' हे शब्दप्रयोग जर जगांतील 'सुरूपता, विरूपता व एकरूपते'ची जाणीव दाखवीत नस-


राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

तील, तर हे शब्द काय दाखवीत ऑहेत, याचा तरी प्रोफेसर साहेबांनीं उलगडा करावा? आकारांतील सुरूपतेची, विरूपतेची व समानरूपतेची जाणीव झाल्यावांचूनच वरील शब्द प्रयुक्त झाले आहेत, असें जर साधारण माणसानें म्हटलें असतें तर त्याला आम्ही 'नीरस' म्हटलें असतें. पण या मंत्राचें अध्ययन केलेले प्रो. मोक्षमुल्लरच जेव्हां तसें म्हणत आहेत तेव्हां त्यांच्या मनोभावनेला कोणता शब्द लावावा हें कांहीं आम्हांला समजत नाहीं. असो. याच विषयीं आणखी एक वचन पहा—

**रुशद्वसानः सुदृशीकरूपः ॥** ऋ. ४।५।१५

"तो चमकणारें वस्त्र नेसणारा उत्तम दर्शनीय सौंदर्यपूर्ण आकारानें युक्त आहे." या मंत्रांतील '**सु-दृशीक-रूपः**' हा शब्द पूर्वीच्या शब्दांवरही बहार करणारा आहे.' उत्तम-दर्शनीय-सौंदर्य' असल्याचा अनुभव वरील शब्दानें व्यक्त होत आहे. मन मोहून टाकणारें सौंदर्य किंवा कितीही पाहत राहिलें तरी आणखी पाहतच राहावें, असें ज्या रूपाबद्दल वाटतें अशा प्रकारचें सौंदर्य '**सु-दृशीक-रूप**' शब्दानें वर्णिलें आहे. तसेंच—

**अक्षकामा मनोमुहः ॥** अथर्व. २। २। ५

स्त्रियांचें वर्णन वरील शब्दांनीं अथर्ववेदामध्यें केलेलें आहे. 'डोळ्यांची कामना तृप्त करणाऱ्या व मनाला मोहून टाकणाऱ्या स्त्रिया आहेत.' सौंदर्याच्या जाणिवेशिवाय वरील शब्द प्रयुक्त होणेंच शक्य नाहीं. ज्याला जगांतील सौंदर्याचा रसास्वादच घेतां येणार नाहीं, असल्या नीरस माणसाच्या डोळ्यांची तृप्ति सौंदर्याच्या अवलोकनानें कशी होणार ? व त्याचें मन त्या रूपांत गुंगल्याशिवाय त्याच्या मनाला तरी मोह कसा पडणार ? असो. असे शेंकडों आधार दाखवितां येतील कीं, ज्याच्या योगानें प्राचीनतम वाङ्मयामध्यें सुद्धां जगांतील अद्भुत सौंदर्याच्या जाणीवेची स्पष्ट कल्पना आहे, असें सहज सिद्ध करतां येईल. पण ब्रह्मदेवालाही ज्यांच्या हृदयाचें रंजन करणें अशक्य अशा प्रकारचीं रसग्रहणाला असमर्थ अशीं हृदयें पुढें आल्यावर त्या वेदांतील काव्यरसानें तरी त्यांच्यापुढें काय करावें ? खरोखरच ब्रह्मदेवानें सुद्धां यांच्यापुढें हात टेंकले असतील यांत कांहींच नवल नाहीं. वरील प्रो. मोक्षमुल्लरांचें मत वाचून रा. वासुदेवराव आपटे म्हणतात—

" सामान्य व्यवहारज्ञान ज्यांना आहे त्यांना सुद्धां मॅक्समूलरसाहेबांचा हा अभिप्राय पटणार नाहीं........आमच्या मतें मॅक्समूलर साहेबांची ही चूक आहे व..........( त्यांचें ) वरील मत निराधार व वस्तुस्थितीस सोडून आहे, हें आम्ही स्पष्ट सांगतों." असें म्हणून पुढें ग्रंथकर्त्यांनीं वैदिक वाङ्मयांतून व त्यापुढील ग्रंथांतून बरेच आधार देऊन प्रो. मॅक्समूलरांचें विधान पूर्णपणानें खोडून काढलें आहे, व एतद्विषयक आर्यांची कल्पना वाचकांच्या मनांत स्पष्टपणानें ठसविण्यासाठीं आधुनिक साधुसंतांच्या काव्यापर्यंत झालेल्या सर्व आर्य साहित्याचें मंथन करून आर्यांची दृष्टि जडामध्यें गुंतून राहत नव्हती, तर ती अलौकिक आत्मशक्तीच्या प्रभावानें उद्दीपित झालेली होती, हें उत्तम रीतीनें सिद्ध केल्यानंतर ते म्हणतातः—

" पाश्चात्य पंडितांची दृष्टि सौंदर्यासंबंधानें विचार करतांना अद्याप इंद्रियग्राह्य अशा जड सृष्टींतच घोंटाळत आहे. इंद्रियातीत असें कांहीं आहे, व त्यांतही सौंदर्य भरलें आहे, हें अद्याप कित्येकांच्या गांवींही नाहीं. त्यांच्या दृष्टीनें सौंदर्याची परमावधि म्हणजे ललितकलाच होय. पण भारतीय तत्त्वज्ञानांना प्राचीन काळापासून या जड सृष्टीच्या पलीकडची, इंद्रियातीत अशी चित्सृष्टि दिसत होती.........हें



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

चित्सृष्टींतील सौंदर्य.......केवळ भक्तीच्या द्वारें आकलन करतां येतें, असें आमच्या भारतीय पंडितांचें मत आहे. या चित्सृष्टीच्या सौंदर्याच्या आकलनापासून होणाऱ्या आनंदाची जड सृष्टीच्या सौंदर्यापासून होणाऱ्या आनंदाशीं कोणत्याही रीतीनें तुलना करतां येत नाहीं. तो आनंद अवर्णनीय, परमावधीचा, अनिर्वचनीय आहे. अनुभवानेंच तो जाणावा लागतो. या बाबतींत भारतीय पंडित पाश्चात्य पंडितांच्या पुष्कळ पुढें आहेत."

ग्रंथकर्त्यांमध्यें वरील जाणीव असल्यानें त्यांचा सौंदर्यावरील हा षट्प्रकरणात्मक विस्तृत निबंध अत्यंत उत्तम वठला आहे, असें म्हणण्यास कोणतीच हरकत नाहीं. सौंदर्यावरील निबंधाच्या पहिल्या प्रकरणांत 'सौंदर्याविषयीं सामान्य विचार' सांगून, कविसम्राट् श्री. रवींद्रनाथ ठाकूर यांच्या संस्मरणीय वाक्यानें त्यांनीं या प्रकरणाची समाप्ति केली आहे. तें वाक्य प्रत्येकानें लक्षांत ठेवण्यासारखें आहे, म्हणून येथें देतों–" जें खरोखर मंगलमय तेंच सौंदर्य. सौंदर्यमूर्ति हीच मंगलाची मूर्ति व मंगलमूर्ति हीच सौंदर्याचें पूर्ण स्वरूप. सत्य हेंच सौंदर्य आणि सौंदर्य हेंच सत्य....आपल्या पायाच्या तळाच्या धुळीपासून तों आकाशांतल्या नक्षत्रांपर्यंत सर्वत्र सत्य, सर्वत्र सौंदर्य, सर्वत्र आनंद भरला आहे. सर्वत्र आनंदरूप अमृत आहे."

ही जी आर्यांची सौंदर्याची कल्पना आहे ती इतरांस कशी होणार ? अशाश्वतांतच सौंदर्य पाहणारांला शाश्वतांतील अमृतमय सौंदर्याची जाणीव तरी कशी होणार ? याच कारणासाठीं आर्यवाङ्मयाचें परिशीलन केलेल्या युरोपीयन पंडितांस सुद्धां आर्यांना सौंदर्याची जाणीवच नव्हती, असें वाटत असतें ! असो. याप्रमाणें पहिलें प्रकरण संपवून ग्रंथकर्त्यांनीं दुसऱ्या व तिसऱ्या प्रकरणांत सौंदर्याचीं लक्षणें व सौंदर्याची अभिरुचि यासंबंधानें बरीच महत्त्वाची माहिती दिलेली आहे, ती सहृदय वाचकांनीं अवश्य वाचावी. चौथ्या प्रकरणांत सौंदर्याविषयीं भारतीय पंडितांचें मत विस्तारानें सांगून पांचव्या प्रकरणांत सौंदर्याविषयींचीं पाश्चात्यांचीं मतें सांगितलीं आहेत. या प्रकरणामध्यें ग्रीक तत्त्ववेत्त्यांपासून तों तहत आधुनिक युरोपियन पंडितांपर्यंतच्या सौंदर्यविषयक सर्व कल्पनांचें सार काढलें असल्यामुळें पश्चिमेकडे या विषयासंबंधाच्या कल्पनांमध्यें कशीं कशीं स्थित्यंतरें होत गेलीं त्यांचें उत्तम ज्ञान या प्रकरणाच्या वाचनानें महाराष्ट्रीय वाचकांच्या मनांत उत्पन्न झाल्याशिवाय राहणार नाहीं. शेवटीं सहाव्या प्रकरणामध्यें " जड सृष्टींतलें सगळें सौंदर्य घ्या, त्याची प्रेरणा मूळ भगवद्भक्ति आहे " ही जी आर्यांची कल्पना तिचें उत्तम समर्थन अगदीं सोप्या व सरळ भाषेंत केलें आहे. तें वाचकांनीं मूळपुस्तकांतूनच पाहण्यासारखें आहे. याप्रमाणें 'सौंदर्य'–विषयक लेखाचें हृदयंगम स्वरूप आहे. आतां याच पुस्तकाच्या उत्तरार्धांतील 'ललित कला' या विस्तृत निबंधाकडे थोडेंसें पाहूं.

## " ललित कला. "

ग्रंथकारानें या विभागावर दहा प्रकरणें लिहिलीं आहेत. पहिल्या प्रकरणामध्यें कला व ललितकला यांतील भेद फार सूक्ष्म रीतीनें व मोठ्या खुबीनें दाखवलेला आहे. कला ह्या नियमांनीं बद्ध असतात. कलांमध्यें प्रावीण्य मिळवूं इच्छिणारा मनुष्य त्या त्या कलांच्या नियमांमध्येंच राहून, नियमांनीं बांधला गेल्यामुळें जणूं काय परतंत्र बनूनच, आपल्या कलेंतील हुन्नर संपादीत असतो व वाढवींत असतो. पण कलांच्या नियमांचीं बंधनें ढिलीं करून जेव्हां अद्वितीय आत्मिक स्फूर्तीनें प्रेरित


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

झालेला कलानिपुण मनुष्य उच्च मनोभावांच्या स्वतंत्र व परिशुद्ध वातावरणांत स्वैर संचार करूं लागतो व आपल्या कलेच्या नियमांच्या आंत राहून सुद्धां तो नियमांनीं बांधलेला न राहतां स्वातंत्र्याचा अनुभव घेऊं लागतो, तेव्हांच त्याचा प्रवेश ललितकलांच्या स्वर्गीय भूमीवर होतो. ही जाणीव ग्रंथकाराला पूर्णपणें झालेली असल्यामुळें त्यांनीं जी ललितकलांचीं लक्षणें केलेलीं आहेत तीं फारच उत्तम व मार्मिकपणानें परिपूर्ण अशीं झालीं आहेत. ललितकलेचीं लक्षणें ग्रंथकाराच्या शब्दांतच पुढें दिलीं आहेत.

(१) ललितकला ही माणसाच्या जड देहाच्या गरजा पुरविणारी नसते, तर मनुष्यांमध्यें सौंदर्याविषयींच्या अभिरुचीची तृप्ति करणें हा तिचा उद्देश असतो;

(२) ललितकलेपासून होणारें सुख जड वस्तूपासून मिळणाऱ्या सुखापेक्षां भिन्न असतें व त्यांत स्वार्थाचा संबंध नसतो;

(३) कृत्रिमपणानें ललितकलेची पूर्णता होत नाहीं. कलेच्या नियमांचें व पद्धतीचें ज्ञान असूनही आणखी त्याला अंतर्यामींची स्फूर्ति व प्रतिभा पाहिजे असते.

(४) ललितकलेमध्यें पूर्ण स्वातंत्र्य असतें. यासाठीं केवळ अनुकरण करणारा मनुष्य ललितकलेच्या दृष्टीनें निरुपयोगी ठरतो.

ललितकलेचीं हीं लक्षणें पाहिलीं म्हणजे ती वास्तविक आध्यात्मिक स्वरूपाची कशी आहे, हें सहजच ध्यानीं येईल. अशा या ललितकला पांच आहेत. (१) वास्तुशिल्प, (२) पाषाणशिल्प, (३) चित्रकला, (४) गायनकला, व (५) काव्य. या त्या पांच ललितकला होत. साधारण माणसाला काव्यांतील रस जसा समजत नाहीं, त्याचप्रमाणें इतर ललितकलांमधीलही रस समजत नाहीं. याचें कारण इतकेंच कीं, त्याच्या आत्म्यावर योग्य संस्कार झालेले नसतात. ललितकलांमधील रस घेण्यास हृदयाची विशिष्ट योग्यता लागत असते. ज्यांची हृदयें सूक्ष्म भावनांचें आकलन करण्यास असमर्थ असतात, त्यांना ललितकलांपासून किंवा कलांच्या लालित्यापासून कांहीं एक आनंद होणें शक्यच नसतें. यासाठीं सर्व लोकांस सारखा आनंद होत नाहीं म्हणून ललितकला निरुपयोगी आहे, असें कांहीं हट्टवादी लोक म्हणत असतात. त्यांनीं आपण किती खालच्या पायरीवर उभे राहिलों आहों, याचा आधीं विचार करावा, आणि मग वरच्या पायरीवरील लोकांस नांवें ठेवावीं. याप्रमाणें पहिल्या प्रकरणांत ललितकलेचें स्वरूप सांगून दुसऱ्या व तिसऱ्या प्रकरणामध्यें पाषाणशिल्प व वास्तुशिल्प यांची बरीच ओळख करून दिलेली आहे. ज्यांना या कलांसंबंधानें कांहीं माहिती नाहीं, त्यांनीं जरी हीं प्रकरणें वाचलीं तरी त्यांस या कलांविषयींची बरीच उपयुक्त माहिती होईल, अशा सुबोध भाषेमध्यें हीं लिहिलीं गेलीं असल्यामुळ या प्रकरणांतील भावार्थ येथें न देतां सहृदय वाचकांनीं हीं प्रकरणें मूळांतच स्वतः समग्र वाचावीं, अशी येथें शिफारस करतों. चवथ्या प्रकरणामध्यें गायनकलेची जी माहिती दिलेली आहे ती इतकी उत्तम आहे कीं, प्रस्तुत समालोचकासारख्या अगदीं गायनकलानभिज्ञ गायनशत्रूच्या अंतःकरणांत सुद्धां तिनें या कलेबद्दलचा आदर वाढवला आहे. तेव्हां हें प्रकरण किती चांगलें झालें आहे, याची कल्पना वाचकांस सहजच होईल.

पांचव्या प्रकरणापासून नवव्या प्रकरणाच्या अखेरपर्यंत चित्रकलेचें लालित्य वर्णन केलें आहे. सर्व पुस्तकांत हाच भाग अत्यंत विस्तारानें व विषयाच्या आवडीनें लिहिलेला दिसतो. युरोपियन व हिंदी चित्रकलांची तुलना तर ग्रंथ-



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

कर्त्यानें फारच मार्मिक रीतीनें केली आहे व जीं अनुमानें काढलीं आहेत, तीं सर्व विचारी विद्वानांला मान्य होण्यासारखीं आहेत. चित्र-कलेवरील या पांच निबंधांच्या शेवटीं जो "दोनही पक्षांचा समारोप" केला आहे, तो वाचला असतां ग्रंथकाराचें हृद्गत त्यांत उत्तम प्रकारें दिसून येतें. म्हणून तो भाग येथें दिल्या-शिवाय ही समालोचना पुरी करतां येत नाहीं;

"पाश्चात्य चित्रकला व भारतीय चित्रकला यांचें ध्येय कसें भिन्न भिन्न आहे व तें साध्य करून घेऊं इच्छिणारांची दृष्टि व मार्ग कसे भिन्न असले पाहिजेत, याचें विवेचन वर आलेंच आहे. पाश्चात्य चित्रकलेची स्वतःचीच स्थिति सध्यां ऱ्हासाची आहे. अशा स्थितींत ऱ्हासाच्या पंथाला लागलेल्या परकीय–म्हणजे पाश्चात्य कलेचें केवळ अनुकरण करण्याच्या नादीं न लागतां आपल्या प्रकृतीला अनुरूप आणि राष्ट्रीयत्वाला पोषक अशा आपल्या जुन्या व आपल्या हेळसांडीमुळें मागें पडलेल्या भारतीय चित्रकलेचें पुनरुज्जीवन करण्याचा यत्न करणें हें प्रत्येक भारतवासीयाचें कर्तव्य आहे. कला व राष्ट्रीयत्व यांचा अतिशय निकट संबंध आहे हें सांगावयास नकोच. हिंदुस्थानांत अनेक धर्म, अनेक भाषा, अनेक विचारपंथ आणि एकराष्ट्रीयत्वाला विघ्न करूं पाहणाऱ्या दुसऱ्या अनेक गोष्टी आहेत; पण या सर्वांची मात्रा न चालूं देतां सगळ्या लोकांत एक भावना जागृत करून सर्वांच्या अंतःकरणांची एकतानता करण्याचें सामर्थ्य जर कशाच्या ठायीं असेल,तर तें भारतीय चित्रकलेच्या ठायीं आहे. तिचा राष्ट्रीयत्वाच्या वाढीकडे उपयोग करून घेणारा योजकच हवा आहे. या दृष्टीनें पाहिलें तर भारतीय चित्रकलेचें पुनरुज्जीवन हें सध्यांच्या काळीं आपल्या आवश्यक कर्तव्यां-तलें एक मुख्य कर्तव्य म्हणतां येईल........अवनींद्रनाथप्रभृति मंडळीनें स्थापलेल्या कलकत्तास्कूलनें आतांपर्यंत भारतीय चित्र-कलेविषयीं जागृति उत्पन्न करण्याचें प्रशंसनीय काम केलें आहे; पण आतां सांगितला अशा तऱ्हेचा दुराग्रह त्या संप्रदायांतल्या कांहीं मंड-ळीच्या ठिकाणीं दिसतो.तो नाहींसा होऊन स्वतः विषयींचा अभिमान आणि गुणग्रहणाविष-यींची तत्परता यांचें योग्य संमेलन घडेल, तेव्हांच आमची भारतीय चित्रकला उत्कर्ष पावून राष्ट्रीयत्वाचें संवर्धन व देशाच्या प्रगतीस साह्य करील, ही गोष्ट विसरतां कामा नये."

अशा प्रकारें तराजूच्या काट्यासारखें सम-तोल मन ठेवून पाश्चात्य व पौर्वात्य चित्रकलांचें निरूपण या पांच भागांमध्यें ग्रंथकारानें फार उत्तम तऱ्हेनें केलें आहे, व यामुळें चित्रकलेव-रील हीं पांचही प्रकरणें अत्यंत उत्तम साधलीं आहेत.वास्तविक पाहतां विविधज्ञानविस्ताराच्या वाचकांस या पंचप्रकरणात्मक चित्रकला निबंधाचा सारांश देणें आवश्यक होतें, पण निबंधांतील मुख्य शास्त्रीय भाग दिल्यास साधारण वाचकांस तो रूक्ष वाटेल, व इतर गोष्टी दिल्यास प्रस्तुत विषयाच्या प्रतिपादनांतील स्वा-रस्य समजणार नाहीं, म्हणून प्रस्तुत विषयाचा सारांश न देतां वाचकांनीं हीं उत्कृष्ट प्रकरणें स्वतः मूळांतच अवश्य वाचावीं असें येथें सांगतों. सर्व ललितकलांची एका दृष्टीनें चित्रकला ही माता आहे. चित्रकलेचा कोणत्या कलेशीं संबंध येत नाहीं अशी कलाच नाहीं. चित्रकलेचा मानवी हिताहिताशीं बराच संबंध आहे. या सार्वत्रिक महत्त्वाच्या हिंदी चित्रकलेची सध्यांच्या नवीन युगांत, विशेषतः युरोपीयन चित्रकलेच्या आक्रमणानें, आपल्या देशांत कशी हीन स्थिति झालेली आहे, याचा ज्यांनीं थोडासा तरी विचार केला असेल, त्यांना हीं


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

अनुक्रमणिका

पांच प्रकरणें अत्यंत उपयुक्त वाटल्याशिवाय राहणार नाहींत.

शेवटच्या दहाव्या प्रकरणामध्यें नाट्यकलेवर निबंध लिहून या पुस्तकाची समाप्ति झालेली आहे. तात्पर्य, नांवाप्रमाणेंच **"सौंदर्य व ललितकला"** हें पुस्तक भाषेच्या व विषयाच्या सौंदर्यानें व लालित्यानें दर्शनीय, वाचनीय व संग्रहणीय झालेलें आहे, यांत शंका नाहीं. मराठी भाषेमध्यें अशा स्वरूपाचें हें पहिलेंच पुस्तक असल्यामुळें महाराष्ट्रीय वाचक या पुस्तकाची द्वितीय आवृत्ति काढण्यास संपादक व प्रकाशक यांस लवकरच भाग पडतील, अशी बळकट आशा आहे.

पुस्तकाचें अंतरंग व बहिरंग उत्तम असेंच आहे. हें पुस्तक श्री० होळकर सरकार ग्रंथमालेपैकीं असून हें इंदूरच्या मराठी ग्रंथोत्तेजक मंडळीला पसंत पडून त्या मंडळीकडूनच याच्या प्रकाशनाला द्रव्याची मदत झालेली आहे. यावरून हें पुस्तक एका विद्वान् मंडळानें पसंत केलेलें असल्यामुळें हें सर्वांच्या आदरास पात्र होण्यासारखें आहे, हें उघड आहे.

या पुस्तकाच्या प्रारंभींच रजपूत चित्रकलेचा नमुना छापलेला आहे. म्हणून यास **'सचित्र'** असें म्हणतां येईल. ललित कलेवरच्या पुस्तकामध्यें यापेक्षां अधिक चित्रें पाहिजेत. पण पाहिजेत म्हणून काय उपयोग ? अशीं पुस्तकें हजारों किंवा लाखों खपूं लागल्याशिवाय त्यांत चित्रें घालण्यास प्रकाशकांना परवडेल तरी कसें? तात्पर्य, अशा पुस्तकांना अधिक सुंदर व चित्ताकर्षक बनवणें हें सर्वथैव महाराष्ट्रीय वाचकवर्गावरच अवलंबून आहे. लेखक व प्रकाशक यांनीं आपलें कर्तव्य केलें आहे. आतां वाचकवर्गाचेंच काय तें कर्तव्य आहे, तें त्यानें करावें असें सुचवून हा लेख येथें संपवितों.

**श्री. दा. सातवळेकर.**




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

## २. डा. काणे (पिता व पुत्रद्वय) यांचीं बोधप्रद अल्पचरित्रें.

काय सांगों आतां संतांचे उपकार । मज निरंतर जागविती ॥ १ ॥
काय द्यावें त्यांचें व्हावें उतराई । ठेवितां हा पायीं जीव थोडा ॥ २ ॥
सहज बोलणें हितउपदेश । करुनि सायास शिकविती ॥ ३ ॥
तुका म्हणे वत्स धेनवेच्या चित्तीं । तैसे मज येती सांभाळीत ॥ ४ ॥ **तुकाराम.**

वरील मराठी पुस्तकाचें नांव फार थोड्या मराठी वाचकांनीं ऐकलें असेल. त्याची जाहिरात वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झालेली दिसली नाहीं. त्याचा उल्लेख मराठी मासिकांत आलेला आढळला नाहीं. त्यावर चर्चा वाचनालयांत अगर इतर सार्वजनिक जागीं झालेली ऐकूं येत नाहीं. त्याचा नामनिर्देश इतर कोठें होत असेल असें वाटत नाहीं. पण अशी वस्तुस्थिति असणें ठीक नाहीं. हा ग्रंथ मराठी वाङ्मय-भक्तांच्या प्रेमादरास पूर्णपणें पात्र आहे. इतकेंच नव्हे, तर तो सर्व होतकरू तरुण सुशिक्षित नव्या लोकांना चांगला सुमार्गदर्शक, लोकहितकारक व आत्मोद्धारक जीवनकार्यास एक चांगला कित्ता होण्यालायक आहे. त्यांत निर्दिष्ट केलेले सर्व चरित्रनायक व त्यांचे चरित्रलेखक, आणि ग्रंथप्रकाशक, या सर्वांचा योगायोग या कृतींत इतका अपूर्व, चित्ताकर्षक, मनोवेधक, व कौतुकास्पद रीतींनीं जमलेला दिसतो कीं, तो पाहून वाचकांना नवल वाटण्यासारखें आहे. इतका प्रस्ताव करून आतां या कृतीचा स्वरूपबोध होण्याकरितां दोन शब्द लिहितों.

या ग्रंथांत तीन "गरिबांचे डाक्तर" या नांवानें एके काळीं मुंबई शहरांत सर्वांच्या ओळखीच्या व नामांकित असलेल्या अशा तिघां सत्पुरुषांच्या जीवनकार्यांच्या रूपरेखा दिल्या आहेत. त्यांचीं नांवें एकदां तर मुंबईच्या सर्व लहानथोरांना घरच्या माणसांइतकींच ओळखीचीं व प्रिय झालीं होतीं. त्यांत गरीबांना तर तीं फारच आवडतीं झालीं होतीं, इतकेंच नाहीं, तर ते महात्मे त्यांना कित्येक वर्षें मायपोटासारखे विसावा देणारे झाले होते. तेव्हां अशांचा परिचय कोणास नकोसा वाटेल? या परोपकारी वैद्यांचीं नांवें **वामन गोपाळ काणे** व त्यांचे दोघे चिरंजीव **सदाशिव वामन काणे**, L. M. S. व **काशीनाथ वामन काणे**, L. M. S. अशीं असून, त्यांस सर्व संबंधी व ओळखीचे लोक अनुक्रमें "तात्या, बाळाभाऊ, व रावजी" असें म्हणत असत, आणि याच टोपण नांवांनीं त्यांचा निर्देश या लेखांत पुढें केला आहे. पहिल्या गृहस्थांचें चरित्र त्यांच्या पदवीधर ज्येष्ठ चिरंजीवांनींच मागें लिहिलें होतें. बाळाभाऊंचें चरित्र त्यांचे जिवलग स्नेही रा. **दामोदर गणेश पाध्ये** यांनीं इंग्रजींत लिहून तें सर ना. ग. चंदावरकर अध्यक्ष असलेल्या एका विख्यात मंडळाच्या सभेंत वाचलें होतें. त्याचें मराठी रूपांतर चरित्रनायकाचे सहाध्यायी व मित्र रा. **काशीनाथ कृष्ण लेले** यांनीं फार चांगलें केलें आहे. काशीनाथपंतांचें त्रोटक पद्यात्मक चरित्र सन १८९२ सालीं त्यांचे मित्र मि. नेने यांनीं लिहिलें होतें. हें पुस्तक मुंबईत एक वेळ सुप्रसिद्ध असलेले वैद्यविद्यालयांतील प्रोफेसर डॉ. अण्णा मोरेश्वर कुंटे, बी. ए., एम्. डी, यांस समर्पण केलें आहे. त्यांस त्यावेळीं 'दक्षिणाप्रैज कमिटी'चें स्थान घेतलेल्या 'डेक्कन व्हर्न्याक्युलर ट्रान्स्लेशन सोसायटी'नें बक्षिस दिलें होतें, व तेव्हांच तें एका मराठी वाङ्मयभक्तानें छापलेंही होतें. त्याचीच ही सुधारलेली पुनरावृत्ति होय. यांपैकीं पहिलीं दोन चरित्रें गेलीं १५।२० वर्षें लेखी प्रतीच्या रूपानेंच पडलीं होतीं. पण तीं सर्व एकत्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध करण्याचा पवित्र व दृढ संकल्प तात्यांचे पुतणे उमरावतीचे नामांकित वकील व मराठी सुप्रसिद्ध ग्रंथकार **गोविंद नारायण काणे** यांनीं फार वर्षें करून ठेवला होता. पण तो आपल्या हातून तडीस न गेला तर आपल्या मागें तरी तें काम शेवटास नेण्यास त्यांनीं आपले स्नेही रा. पाध्ये यांस सांगितलें होतें. त्याप्रमाणें त्यांनीं (पाध्ये) हा ग्रंथ एकत्र जमवून प्रकाशनास तयार केला. आणि तो गोविंदरावांच्या धर्मपत्नीनें आपल्या पूज्य पतीच्या मनोदयानुरूप सन १९१८ त प्रसिद्ध करण्याचें श्रेय घेतलें. त्यास


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

अनुक्रमणिका

आरंभीं रा. पाध्ये यांनीं एक प्रस्तावना लिहून तिच्यांत वरील सर्व वृत्तांत दिला आहे. त्यांत गोविंदराव काण्यांचेंही एक त्रोटक चरित्र दिलें आह. एकंदरींत या कृतींत महनीय अशा चौघां सुशिक्षित लोकोपकारक विद्वान् अशा सत्पुरुषांच्या अनुकरणीय व सद्बोधप्रद अशा जीवनकार्यांचीं चित्रें वाचकांच्या डोळ्यांसमोर उभीं राहून त्यांस तीं मनोहर वाटतात. आणि सृष्टिसौंदर्यानुरूप मानवी अंतरंगाची मनोवेधक शोभा पाहून त्यांस परमात्मकृतीचें कौतुक वाटतें. या कृतींत वरील चौघांही नायकांच्या जीवनांत जो ठळक विशेष दिसतो, त्याचाच विचार या जागीं कर्तव्य आहे. त्यांत ग्रंथाची पुनरुक्ति करण्याचें कारण नाहीं. कारण हा संपूर्ण ग्रंथच वाचनीय, मननीय व संग्रहणीय होय. " डॉ. वामन गोपाळ यांचा सार्सापरेला " या जाहिरातीनें तर त्यांचें नांव आबालवृद्धांना माहितच झालें आहे. शिवाय ते पहिल्या पिढीचे मराठींतून इंग्रजी वैद्यक शिकलेले ( हॉस्पिटल असिस्टंट ) होते. या दृष्टीनें त्यांच्या जीवनकार्यास ऐतिहासिक स्वरूप आहे. त्या वेळचें विद्याखातें, विदेशी गुरु व उपगुरु, त्यांचा विद्यार्थ्यांशीं संबंध, त्यांचें त्यांशीं प्रेमळ, सलगीचें, अगत्यवादाचें, सहानुभूतीचें वर्तन इत्यादि अनेक नवे नवे प्रकार पाहून वाचकांना त्यावेळच्या परिस्थितीचा पुष्कळ बोध होतो, व त्यांच्या ज्ञानांत भर पडते. पहिल्या इंग्रजशाहीचें मनोहर रूप त्यांस सुखप्रद वाटतें. तसेंच मराठेशाहीची अंतिम स्थिति भयंकर वाटते. हा संक्रमणकाळ किंवा संधि अनेक दृष्टींनीं विचारणीय वाटतो. त्याचें थोडेसें दिग्दर्शन येथें देतों.

## काणे यांचें कुलीन घराणें.

( २ ) काणे घराणें मूळ कोंकणांतूनच मराठी राज्याच्या ऐन अमदानींत संपूर्ण गुणिजनांचें माहेरघर जें पुणें शहर तेथें आलें. इतर अनेक गुणिजनांप्रमाणें त्यांच्याही योगक्षेमाची चांगली सोय झाली. सरकार दरबारांत त्यांचा बहुमानही नीट होत गेला. परंतु त्यांच्यापैकीं कोणींही राजसेवा पत्करली नाहीं. फक्त धर्मविषयक प्रकरणांत प्रसंगोपात्त सरकारांतून विचारल्यास मंत्रिमंडळांत जाऊन ते त्यांत सल्लामसलत मात्र देत असत. अशा वेळीं त्यांस सभेंत नेण्याकरितां सरकारांतून पालखी येत असे. हा त्यावेळचा एक बहुमान होता. याप्रमाणें तीन पिढ्यांपर्यंत चाललें. शेवटच्या रावणशाही अंमलांत मात्र त्यांचें महत्त्व कायम राहणें कठीण झालें. एका तापसी वृत्तीच्या वेदशास्त्रसंपन्न अशा विद्वान् ब्राह्मणाचा नकळत एकदां या घराण्याच्या मूळ पुरुषाच्या हातून अपमान झाला होतो. तेव्हां त्या ब्राह्मणानें शाप दिला होता. त्यानें या कुळांत उतार वयांत कोणाना कोणास थोडा भ्रम होतो, असा ग्रह व अनुभव जुन्या पिढीचा असे.

पण नव्या पिढींत या शापाचा अंमल बंद झालासा दिसतें. पुढें मराठी राज्य बुडाल्यावर अनेक कुलीन घराण्यांची दुर्दशा उडाली, त्यांतच हें घराणें आलें. तरी जुन्या ठेवीवर त्यांतील पुरुषांनीं आपला चरितार्थ कसा बसा चालवला.

## घराण्याची विपन्न दशा व वामनरावांचा जन्म, उत्कर्ष.

( ३ ) मराठी राज्य बुडाल्यावर दुसऱ्याच सालीं तात्या जन्मले ( १८१९ ). इतर अनेक पुढें नांवारूपास आलेल्या थोर पुरुषांप्रमाणें बाळपणीं ते अत्यंत **व्रात्य, स्वच्छंदी, उनाड, खेळाडू, हट्टी** होते. शिकण्याकडे त्यांचें लक्ष मुळींच नसे. त्यांचे हातून त्यांच्या कुळाचें ऊर्जित होण्याची कोणासच आशा वाटत नव्हती—इतक्या वाईट खोडी त्यांस लागल्या होत्या. हा क्रम १८ वर्षांपर्यंत कायम होता. सर्व कांहीं निराशाजनकच दिसत होतें. फक्त त्यांत दोन गोष्टी मात्र थोड्याशा बऱ्या दिसत होत्या. एक तर देवाची अढळ भक्ति त्यांच्या ठायीं असल्याचीं चिन्हें दिसत होतीं. तसेंच **सत्यनिष्ठेचे अंकुर** त्यांच्यांत जिवंत, जाज्वल्य, प्रखर व सदैव जागृत असत; इतके कीं, त्या पायीं त्यांस आपल्या जिवाची देखील पर्वा वाटत नसे. पण या सत्याचें स्वरूप बरेंच किरकोळ, एकेरी व शाब्दिक दिसतें. लोकमान्यांच्या '**गीतारहस्यांत**'लें त्याचें व्यापक, गहन, गंभीर व सर्वसाक्षी रूप या पोरवयांत कळणें शक्यच नव्हतें. पण शेवटपर्यंत तरी तें त्यांच्या ठायीं प्रकटलें असेल, असें दिसत नाहीं. आपल्या घरच्या भौतिक दुर्दशेचें भान त्यांस नसे. त्यांत त्यांच्या वडीलधाऱ्या माणसांना, त्यावेळच्या



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

अनुक्रमणिका

प्रघाताप्रमाणें, त्यांच्या लग्नाची घाई झाली ! आणि तें कसें तरी उरकून आपल्या भारांत त्यानीं जास्त भर टाकली ! यावेळीं तात्यांना इंग्रजीचें थोडेंसें ज्ञान झालें होतें. पण घरीं दोनप्रहरची भ्रांत पडली म्हणून यांनीं एक उद्योग आरंभिला. पण त्यांत त्यांच्या भोळसरपणामुळें त्यांना बिनभाडयाच्या घरांत जाण्याची पाळी आली. आणि सत्यनिष्ठेनें भयंकर तलवारीच्या धारेवर धरल्यामुळें त्यांच्या जन्माचें मातेरें होण्याची वेळ आली; पण दोनशें रुपये दंडावरच ती टळली ! या भयंकर ठोकरीनें त्यांच्या घरची दैन्यदशा अपार झाली. पण तात्यांचे मात्र डोळे चांगले उघडून २१३ वर्षांत त्यांनीं उनाडपणांत घालविलेल्या दहा वर्षांची भरपाई चांगल्या तऱ्हेनें केली. आणि ते त्यावेळच्या शिरस्त्याप्रमाणें 'डाकतर' बनले. त्यावेळचे हायस्कुलचे इंग्रजी हेडमास्तर व कॉलेजांतील इंग्रजी प्रोफेसर आपल्या शिष्यांना **मनापासून, जीव लावून, मोठ्या अगत्यानें, आस्थेनें व प्रेमानें शिकवून** त्यांच्या निर्वाहाकरितां आपल्या पदरचा पैसा देत. त्या वेळीं आताप्रमाणें पैशापासरो चाकऱ्या झाल्या नसल्यानें राजसेवेंतही त्यांचा चांगला उत्कर्ष होई. या राजसेवेपायीं तात्यांनीं सिंधहैद्राबाद, कराची, सक्कर व इतर अनेक देशविदेश करून, ते फौजी-डाकतर होते म्हणून १८४०-४२ चें अफगाणचें युद्ध-क्षेत्र पाहण्याचा त्यांना योग आला. तेथून ते सुरक्षित-पणें परत आले, हें त्यांचें मोठेंच भाग्य होय. याप्रमाणें दहा वर्षांपर्यंत फौजी नोकरींत काढल्यामुळें त्यांच्या व्यवहारज्ञानांत व वैद्यविद्येच्या अनुभवांत चांगलीच भर पडली. पण त्यांचे मनस्वी हाल झाले आणि त्यामुळें त्यांस या चाकरीचा अत्यंत वीट आला. तो इतका कीं, मातृभक्तीस मान देऊन त्यांनीं तिशीं आपली फारकत करून घेतली आणि ते खासगी वैद्यकीचा धंदा करूं लागले. पण ही वेळ (१८४८) त्यांस अनुकूल नव्हती. त्यांत त्यांचा व त्यांच्या कुटुं-बाचा नीट निर्वाह चालण्याची धडगत दिसेना. तेव्हां पुन्हां नौकरी करणें त्यांना भाग झालें. त्यामुळें त्यांनीं मध्यहिंदुस्थानच्या खैराती दवाखान्यांत पुन्हां चाकरी धरली. या जागीं त्यांच्या गुणांचें चांगलें चीज झालें. तेथील बडेसाहेब, इंग्रजी डाक्तर, राजेरजवाडे, संस्था-निक, तसेंच गरीबगुरीब, अनाथ इत्यादि सर्व प्रकारच्या लोकांला त्यांचा चांगला उपयोग झाला. सर्वत्र त्यांची वाहवा व जयजयकार हीं होऊं लागलीं. स. १८५७ सालच्या बंडांत त्यांचा जीव मात्र मोठ्या शर्थीनें वांचला. पण इतर सर्व मालमत्ता, दवाखाना, घरदार या सर्वांची बंडखोरांनीं होळी केली. या वेळींही त्यांच्या सत्यनिष्ठेनें त्यांना भयंकर कसोटीस लावून पुन्हां त्यांचें जबरदस्त नुकसान होण्याची वेळ आणली होती. पण त्यांना मान देणाऱ्या साहेब लोकांच्या कृपेनें ती टळली ! आणि त्यांची नुकसानभरपाई झाली. या कामांत त्यांचा पोकळ बडेजाव मात्र चोहोंकडे वाढला. पण त्यांच्या विदेही निस्पृहपणा, विशाळ भूतदया, सार्वत्रिक परोपकारबुद्धि, इत्यादि अलौकिक गुणांमुळें त्यांच्या मिळकतींत भर पडण्याच्या जागीं तिला ओहोटीच लागत गेली. त्यांचें कर्ज वाढूं लागलें. आदाखर्चांत मेळ पडेना. दोन तीनदां व्यापारधंद्याच्या योगानें ही तूट भरून काढण्याचा त्यांनीं प्रयत्न करून पाहिला. पण परस्वाधीनतेमुळें व व्यापारधंद्यांतील अज्ञानामुळें त्यांस तोटाच येत गेला. "भीड भिकेची बहीण" हें तत्त्व त्यांच्या अंगीं नीट न मुरल्यामुळें कृतघ्नपणानेंही त्यांच्या पदरास खार लागे. मध्यं-तरीं बडोद्यास आपला उत्कर्ष होण्याच्या आशेनें ते तेथें गेले होते. पण राजदरबारी डावपेंच त्यांना अमान्य झाल्यानें त्यांच्या सत्यनिष्ठेनें त्यांना यावेळीं दगाच दिला. यावेळीं राजसेवेच्या खडतर मार्गक्रमणांत त्यांचीं तीस वर्षें गेलीं होतीं. त्यांत अनेक देशविदेश त्यांनीं केले. मोठमोठीं पुण्यक्षेत्रें त्यांनीं पाहिलीं. बड्या इंग्रज अधिकारी वर्गांत, राजे महाराजे, व्यापारी, लक्ष्मीपुत्र, निर्धन सत्पुरुष, मध्यम स्थितींतील प्रापं-चिक जन, अनाथ, भिकारी, कंगाल, वगैरे सर्वांच्या सहवासांत येऊन अनेक सुखदुःखें त्यांनीं भोगलीं. पण शेवटीं अनक सत्पुरुषांप्रमाणें या सेवाधर्माची त्यांना **ओकारी** येऊन त्यांनीं ही शृंखळा तोडण्याचा निश्चय केला. पण या कर्जबाजारीपणाची तोड कशी काढावी ही मोठी नड येऊन पडली. तथापि त्यांची ईश्वरनिष्ठा अढळ होती. आणि तिनेंच बडेसाहेबांच्या हृदयांत प्रवेश करून त्यांच्या द्वारें त्यांची सुटका केली. या


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

अनुक्रमणिका

गोऱ्या महाराजांनीं वाहत्या गंगेंत सहज हात धुऊन, एका बड्या सरदारास त्यांचें राहतें घर घेण्यास उत्तेजन देऊन, तात्यांना कर्जमुक्त केलें. तसेंच दोघां महाराजांनीं तात्यांचे उपकार स्मरून त्यांस चांगलीं वर्षासनें करून दिलीं. त्यामुळें त्यांच्या मागची निर्वाहाची फिकीर गेली. यापुढें मुंबईस जाऊन तेथें वैद्यकीचा धंदा करण्याचा त्यांनीं बेत केला. आणि शेवटचीं ७।८ वर्षें गरीबांचे डाकतर म्हणून तेथें त्यांचा चांगला लौकिक झाला. त्यांस चांगली प्राप्ति होऊं लागली. त्यांच्या स्नेही मंडळींत रा. ब. दादोबा पांडुरंग, मोरोबा, विनोबा मांडवीकर, रिव्हटसेक साहेब, रे. विष्णु भास्कर करमरकर, निळकंठ शास्त्री गोरे, इत्यादि त्या काळचे नामांकित लोक होते. वस्तुतः पाहिलें तर या वेळीं ( १८७१ ) मुंबईत पदवीधर डॉक्टरांतच मोठी चढाओढ असे. अशा स्थितींत बिन-पदवीच्या तात्यांना तेथें थारा मिळणें म्हणजे कठीणच खरें ! पण बड्यांचा रोजगार बड्या लक्ष्मीवंतांतच चाले. गरिबांना त्यांचा लाभ होणें म्हणजे फारच कमी ! अशा स्थितीमुळें तात्यांचा जम नीट बसला. शिवाय तात्या जरी पदवीधर नसले तरी त्यांचें आपल्या वैद्यविद्येचें अनुभवगम्य व स्वकष्टार्जित ग्रंथांतर्गत ज्ञानही पुष्कळ पदवीधरांच्या पुस्तकी माहितीहूनही जास्त सरस, गहन, व व्यापक होतें. आणि **रोग्यांची श्रद्धा** त्यांच्याठायीं **अढळ** होती. त्यांची रोग्यांविषयीं कळकळ अपार असे. अशा स्थितींत त्यांच्या हातून कांहीं आजारी माणसें पदवीधर वैद्यांच्या हलगर्जीपणानें व बेपर्वाईनें बिघडलेलीं किंवा त्यांनीं **असाध्य** कोटींत घातलेलीं सुधारलीं, व निकोप होऊन उठलीं. त्यांच्याविषयीं सामान्य लोकांचा विश्वास वाढला व ते बड्या डाक्टरांच्या नादीं लागेनातसे झाले. त्यांत त्यांची " फी " बद्दल कधींच तक्रार नसे. ती दिली तरी वाहवा, नाहीं दिली तरी पर्वा नाहीं. या निर्लोभी औदासीन्यामुळें त्यांची प्राप्ति दरमहा ४००।५०० रु. पर्यंत वाढली. तेव्हां ती गैरवाजवी व फाजील वाटून त्यांनीं आपल्या औषधांच्या किंमती कमी केल्या. व गरीबगुरीब अनाथांस फुकट औषध देण्याचें प्रमाण जास्त केलें. निर्वाहाकरितां म्हणून हा धंदा त्यांनीं पत्करला होता. त्यांत द्रव्यसंचयाचा विचार नसे. त्यामुळें त्यांचा योगक्षेम नीट चाले. शस्त्रक्रियेंत त्यांचा हातखंडा होता. इंदुरांत असतांना देखील खुद्द गोरे डाक्टर त्यांच्याच हातून कठीण शस्त्रप्रयोग करवून आपण तो पाहत बसत. या त्यांच्या निपुणतेमुळें हिंदुस्थान सरकारनें १८६२ सालीं भर दरबारांत त्यांना वैद्यकी-हत्यारांची बहुमोल पेटी त्यांच्या वरिष्ठांच्या शिफारसीनें नजर केली होती. नेत्ररोगाचीं औषधें व शस्त्रप्रयोग यांत ते विशेषच प्रवीण होते. त्यांनीं कांहीं दुर्धर रोग बरे केले होते, त्यामुळें त्यांच्याकडे लोकांचा ओढा विशेष असे. त्यांत अस्पृश्य जातीयांस त्यांच्याकडे मज्जाव नसे. त्यांच्या घरीं जाण्यांत देखील ते नेहमीं तयार असत. मात्र घरीं आल्यावर ते स्नान करीत. त्यामुळें सर्वांस ते प्रिय होऊन त्यांचें चांगलें वजन बसलें आणि मुंबईसारख्या वकाली शहरांत देखील त्यांचा उत्कर्ष झाला, यांत नवल काय ? यासंबंधीं ते एकदां म्हणाले, " येशू ख्रिस्ताच्या अंगीं चमत्कार करण्याची शक्ति देवानें दिली होती. त्या शक्तीच्या योगानें त्यानें अनेक लोकांस अनेक आधिव्याधींपासून मुक्त केलें. मला थोडासा गुण देवानें दिला आहे, त्याचा मीं उपभोग घेऊन रोग्यांस व्याधींपासून यथाशक्ति तर मुक्त केलेंच पाहिजे.' त्यांचा अंतही त्यांच्या परोपकाररत अशा साधुजीवनास अनुरूप असा स. १८७७ त एका क्षुद्र तापाचें निमित्त होऊन झाला. त्यांच्या मागेंही त्यांच्या कुटुंबाचें तसेंच चाललें. पूर्वोक्त महाराजांनीं त्यांचीं वर्षासनें त्यांचा वडील मुलगा पदवीधर डाक्टर होईपर्यंत चार वर्षें चालू ठेवलीं, व त्यांचा दवाखाना तोंपर्यंत त्यांच्या एका कृतज्ञ सच्छिष्यानें ( गौतमराव केशव ) चालू ठेवून १८८१ सालीं त्यांच्या वडील मुलाच्या स्वाधीन केला. त्यांच्या मागें डॉ. गणपतसिंग यांचें नांव मध्यहिंदुस्थानांत चांगलेंच गाजलें. तसेंच गौतमराव केशव, कृष्णाजी त्रिंबक डोंगरे इत्यादिकांनींही चांगला लौकिक संपादिला.

( ४ ) त्यांचे **डा. सदाशिवराव काणे** वडील चिरंजीव गरीबांचे डाक्टर " म्हणून सर्वांचे मुखीं नांवाजलेले सदाशिव वामन काणे, एल्. एम्. अँड एस्. यांचें जीवनकार्य तर मुंबईच्या लोकांच्या पूर्ण परिचयाचें आहे. त्यांचा विसर मुंबईतील


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

जुन्या आबालवृद्धांना फार काळ पडणार नाहीं. त्यांनी आपल्या परमपूज्य पित्याच्याच पाऊलवाटेनें जाऊन त्यांच्या लौकिकांत चांगलीच भर घातली आणि त्यांचे मनोरथ पूर्ण केले. "मी आतां तुजकरितां पेरणी करून ठेवतों—माझ्या मागून त्यांची कापणी कर—" असें तात्या त्यांना नेहमीं म्हणत. त्याप्रमाणें पित्याची सदिच्छा त्यांनी पूर्ण करून, वीस वर्षे त्यांचेंच सद्व्रत चालवून, यदृच्छेनें मिळालेल्या प्राप्तीचे तीन सारखे वांटे केले. त्यांत पहिला आपल्या कुटुंबाच्या चरितार्थास दिला. दुसरा गरीब आप्त स्वकीयांना वाटला. आणि राहिलेला तिसरा सुमारें तीस हजार रुपये. खासगी शिक्षणसंस्था, अनाथबालिकाश्रम, खैराती दवाखाने, इत्यादि लोकहितसाधक लोककार्यास अर्पण केला. अशा रीतीनें या महात्म्यानें आपला मनुष्यदेह सार्थकीं लावून पवित्रकर्तव्यकर्मरूपी यज्ञांत आपल्या अमोल जीवनाची आहुती दिली, असें म्हणणें भाग आहे. कारण शेवटच्या दुर्धर व दुःसह दुखण्यांतही आर्त व त्रस्त जनांचें कार्य करण्याचा योग आल्यास, आपल्या जिवाची उपेक्षा करून, तो निर्लोभपणें त्यांनीं वायां जाऊं दिला नाहीं. याप्रमाणें एक प्रकारें आपलें आयुष्य त्याच्या उपयोगास वाहिलें, असें म्हटलें पाहिजे. आपल्या अपूर्व योजकतेनें व काळजीनें कांहीं दुर्धर क्षयरोगी त्यांनीं वांचवून बरे केले. पण त्याच रोगास ते स्वतः बळी पडले, हा ईश्वरी चमत्कार होय! समकालीन बहुतेक लोककार्यांत त्यांचें अंग असे. बहुतेक लोकनायक त्यांचे प्रेमळ मित्र असत. त्यांच्याकरितां वाटेल ती झीज सोसण्यास व त्यांस मदत देण्यास ते एका पायावर सदैव तयार असत. अनेक लोकनायकांच्या व सत्पुरुषांच्या स्मारकास सढळ हातानें त्यांनीं मदत दिली—पण स्वतःच्या स्मारकाचा विचार त्यांस शिवला नाहीं! इतकी त्यांची विनयशीलता अपार होती. तात्पर्य, बाळाभाऊंचें गुणवर्णन कितीही केलें तरी तें थोडेंच होणार! इतकें तें अपार होतें. टीकाविषयक चरित्रांत देखील त्यांचें त्रुटित दिग्दर्शन करणें शक्य झालें. नायकाशीं प्रत्यक्ष सहवास असणाऱ्या चरित्रकारासच असें वाटलें, तर मग या अल्प परीक्षणांत त्याचें पूर्ण स्वरूप कसें येणार!

## त्यांच्या जीवनकार्याचा अकालीं शेवट.

(५). त्यांच्या दुखवटयाच्या सभेचे अध्यक्ष सर नारायणराव चंदावरकर यांच्या शेवटच्या समारोपांत त्यांनीं संपूर्ण मनुष्यप्राण्याचे तीन वर्ग केले. त्यांत पहिला पोटपोशांचा. ते स्वतःकरितां म्हणजे खाण्यापिण्याकरितां, फार झाले तर आपल्या आप्तस्वकीयांच्या निर्वाहाकरितां, जगतात. आणि तेंही त्यांना नीट साधत नाहीं! "खायाला काळ धरणीला भार" म्हणतात अशांच्या भारानें ही धरणीमाता वाकून गेली आहे. दुसरा वर्ग-श्रेष्ठ कर्त्या पुरुषांचा. ते आपल्या अतुल पराक्रमांनीं जगाचीं सूत्रें हातीं धरून प्रसंगानुसार त्याचें हित किंवा घात करतात. त्यांत शूर वीर, राजकार्यधुरंधर, शककर्ते राजे महाराजे, इ. येतात. तिसरा वर्ग म्हटला म्हणजे सत्पुरुषांचा. त्यांचें पुष्कळसें जीवनकार्य—म्हणजे निर्जन वनास सुवासदायी करणारीं एकांतवासी फुलझाडें, किंवा अमृतोदकांनीं परिपूर्ण असे जलाशय, सरोवरें, जलप्रवाह इत्यादिकासारखेंच असतें. त्यांचा आमोद त्यांकडे आवर्जून जाणारे रसिक संबंधी, स्नेही सोबती, गुणज्ञ गुणग्राहक, आर्त, यांनाच होतो. विस्तृत लोकसमाजास त्याचा लाभ होणें म्हणजे कठीणच होय. पण हा वर्गच संपूर्ण मानवी देहाचा आत्मा, त्यास सदैव सजीव ठेवणारा, त्यास कालांतरानेंही नासूं सडूं न देणारा, व त्यास सचेतन राखणारा मानवी क्षार (Salt) होय! त्याच्यामुळेंच हा समाज नामशेष होऊन लय पावत नाहीं व नष्ट होत नाहीं. त्यामुळेंच त्याचे गुण जगजाहीर होऊन त्याचा दुंदुभी वाजतांना ऐकूं न आला तरी तो सर्व जनतेचा तारक होतो! याहून वरिष्ठ व श्रेष्ठ पुरुषार्थ तो कोणता!

## डॉ. काशीनाथ वामन काणे.

(६) त्यांचा धाकटा भाऊ काशीनाथ वामन काणे, एल्. एम्. अँड एस्. ऊर्फ रावजी यांचा सारा ग्रंथच २८ वर्षांच्या आंत आटपला. तेव्हां त्याच्या गुणविकासास व त्यांच्या प्रसारास फारसा अवकाशच मिळणें शक्य नव्हतें. तथापि इतक्या अल्प अवधींत देखील आपलें सौजन्य, सर्वभूतानुकंपा, आर्तत्राण, वैद्यकीज्ञान, करामत, अपूर्व चिकित्सा, सुयोजकता इत्यादि अमोल गुणांनीं ते आपल्या वडील भावाचा


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

" उजवा हात " होऊन, त्यांचा बराचसा कार्यभार हलका करून, त्यांस विसावा देत. "वनस्पतिशाखें"त त्यांची शोधकता विशेष मार्मिक व अंतर्भेदी असे; आणि देशी वनस्पतींचें शास्त्रोक्त संशोधन करण्याची कला शिकण्याकरितां एकदां विलायतेच्या यात्रेसही ते गेले होते. पण अभ्यासाची कालमर्यादा पुरी होण्यापूर्वींच कांहीं अपघातामुळें त्यांस हा शिक्षणक्रम मध्येंच सोडावा लागला, आणि ते परत मुंबईस आले. नंतर थोडीं वर्षें त्यांनीं आपल्या भावाच्या दवाखान्यांत काम केलें. या मुदतींत त्यांनीं आपल्या सात्विकपणानें आपल्या गुणांचें तेज इतकें पाडलें कीं त्यांच्या अकालीं अंतानें सर्वांना चटका लावून सोडला. बाळाभाऊंला तर हा धक्का इतका जबर बसला कीं, त्यांतून ते पुरे सांवरलेच नाहींत असें दिसतें. केवळ पवित्र कर्तव्यकर्मनिष्ठेनें त्यांच्या मागें ते १९१० वर्षें आपलें अंगीकृत कार्य रेटीत असत. त्यांत रतिभर उणें पडूं देत नसत. पण अशा हताश स्थितींत त्यांची अंग-यष्टी खचत गेली. "शरीर माद्यं खलु सर्वसाधनम्" याकडे न पाहतां त्या जागीं " कर्तव्यमाद्यं खलु सर्वसाधनम् " हें तत्त्व आचरणांत ठेवल्यामुळें, शेवटीं निसर्गदेवतेचा शाप त्यांना भोंवला—आणि क्षयानें त्यांस ४७ व्या वर्षींच या जगास सोडण्याची पाळी आणली ! इतकी त्यांची कर्तव्यजागृति प्रखर, तीव्र, प्रज्वलित अशी सदैव राहिली ! आमच्या पुष्कळशा लोककार्यकर्त्या पुढाऱ्यांची अशीच गत होतांना दिसते. कांहीं तर सुखासीन वृत्तीमुळें पुरे स्वार्थी बनतात. लोककार्याची पहिली कांहीं कल्पना असली तर पुढें त्यांची व तिची पुरी ताडातोड होते. शेवटीं पूर्ण अपात्र झाल्यावरच ते काम सोडतात. बहुतेक कामांत असतांच जग सोडतात. आणि जमलें तर शेवटीं **जिवंत मरणाधीन** होऊन जातात. फार थोडे सुशिक्षित लोक जनहिताच्या कामांत पडतात. आणि अशा थोड्यांना देखील लोकांची सहानुभूति पुरीशी नसल्यानें त्यांच्या संस्था नीट चालत नाहींत. हा समाजघटनेंत भयंकर दोष, किंवा रोग जडला आहे. त्यामुळें सर्व कांहीं लंगडें पडतें. प्रखर जीवनार्थकलहामुळें लोककार्यास निःस्वार्थानें वाहून घेणारे लोक अगोदरच थोडे, आणि त्यांचाही चरितार्थ नीट होण्याची मारामारच ! ही वस्तुस्थिति कालगतीनें सुधारण्याचीं चिन्हें आहेत, अशी आशा करणें रास्त दिसतें. या दृष्टीनें हा छोटासा २०० पानांचा ग्रंथ नव्या होतकरू सुशिक्षितांस फारच उत्तेजक, अनुकरणीय व उदाहरणीय होण्यास पात्र आहे. यांतील चौघांचींही चरित्रें बोधप्रद होत. ते सर्व व्यवहारी दृष्टीनें साधु होते.

## जुन्या पहिल्या पिढीच्या सुधारणा.

( ७ ) तात्या हे जुन्या पहिल्या पिढींतले असून, नुसते **बोलके** सुधारक नसून **कर्ते,—व हाल-अपेष्टा सोसणारे—सामाजिक व धार्मिक सुधारक** होते. पण समाजाशीं बंडखोरपणा करणारे व त्यांस चिडविणारे भांडखोर ते नव्हते. पुनर्विवाह, स्त्रीशिक्षण, परदेशगमन, प्रामाणिक देशी ख्रिस्तभक्तांचे स्नेही, या सर्वांशीं त्यांचा सहानुभाव असे, व त्यांस त्यांचेकडून यथाशक्ति साह्य मिळे. गरिबांस तर ते मायबापासारखेच वाटत. त्यांची ईश्वरनिष्ठा व सत्यप्रेम इतकें जाज्वल्य होतें कीं, त्यांस दृष्टांत व साक्षात्कार होऊन, देव पाठीराखा आहे असा त्यांचा समज खरा झाल्याचे, या कृतींत २१३ उल्लेख आहेत. त्यांचें विश्वबंधुत्वही इतकें व्यापक होतें कीं, त्यांस **अजात-शत्रु** असें म्हणणें भाग आहे. त्यांचा मतभेद तत्त्वाशीं होई; पण व्यक्तीपर्यंत त्याचा मजल कधींच जात नसे. त्यांचें अहित करणारांचें कल्याण करण्यांतच त्यांस आनंद वाटे. वाटेल तो स्वार्थत्याग करण्यास ते मागेंपुढें पाहत नसत. पण त्यांचा करारीपणा दुसऱ्यास तापद नसे. त्यांची शिस्त प्रखर असे. पण त्याच्या मुलाशीं प्रेमभाव असल्यानें ती सर्वांना सुसह वाटून त्यांचा गौरवच होई. त्यांच्या उभय चिरंजीवांत त्यांचें प्रतिबिंब पडलेलें दिसे. सर्वांनीं जीवनकार्यें नव्या पिढीस चांगल्या वळणदार, सुबोध, सुवाच्य कित्त्यासारखी वळविण्यास योग्य आहेत.

## गोविंदराव काणे.

(८) तात्यांचे पुतणे गोविंदरावही त्यांच्याच तालमींत तयार झाले असून त्यांच्या सारखे परोपकारी, लोककार्यरत व स्वतंत्र होते. पदवीधर


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

अनुक्रमणिका

नसले तरी त्यांस विद्यालयांत शिक्षण मिळालें होतें. ते चांगले कायदेपंडित असून उमरावतींतील नामांकित वकिलांत त्यांची गणना होती. विशिष्ट मानसिक स्थितींत ते ख्रिस्ती झाले असले तरी त्यांचा सर्व संबंध, व्यवहार, लोककार्यपरता, हीं पूर्णदेशाभिमानी स्वदेशभक्तास पूर्णपणें शोभेशींच होतीं. कांहीं विदेशी ख्रिस्तभक्त तर त्यांस आपल्याप्रमाणें मानून त्यांच्याशीं प्रेम राखीत. ते मोठे मराठी वाङ्मयभक्त होते; आणि त्या क्षेत्रांत त्यांनीं थोडे पण चांगले ग्रंथ लिहिले आहेत. गौतमबुद्ध, महमद पैगंबर, व बेकन, या महाशयांचीं त्यांनीं केलेलीं चरित्रें चांगलीं मार्मिक व वाचनीय आहेत. त्यांनीं प्रस्तुतचा ग्रंथ प्रसिद्ध करण्याचा संकल्प केला होता. पण तो कार्यपरतेमुळें तडीस न गेल्यानें त्यांच्या धर्मपत्नीनें त्यांचे मनोरथ पूर्ण केले हें वर आलेंच आहे.

( ९ ) या शिवाय पूर्वोक्त तिघेही डाक्तर चांगल्या प्रतीच्या संशोधक वर्गीत मोडण्यासारखे होते. तात्यांचा " सार्सापरेला " तर सर्वांना ठावूकच आहे " बालामृत " कार रा. डोंगरे हेही त्यांच्याच तालमींतले होत. बाळाभाऊ व रावजी हेही असेच कल्पक व संशोधक होते. वनस्पतिशास्त्रांत त्यांचें ज्ञान विशेष होतें. पण नांवारूपास येण्यापूर्वी ते अकालीं गत झाले हें शोचनीय होय.

## चांगल्या मराठी ग्रंथांची उपेक्षा.

(१०) असा चांगला ग्रंथ गेलीं १८।२० वर्षे पडून राहावा हें दुर्दैवच खरें ! आणि तो छापून निघाल्यावरही दोन वर्षे त्याचा फारसा नामनिर्देशही कोठें न येतां, पुष्कळांस तो माहितही नसावा, हें मराठी साहित्याच्या उत्कर्षाचें चिन्ह खास नाहीं. इतकीं भाराभर मासिकें, त्रैमासिकें, नियतकालिकें, वृत्तपत्रें चालू असून त्यांनीं त्याकडे पाहूं नये हें नवलच खरें. ग्रंथप्रकाशक मंडळ्या, छापखानेवाले इत्यादिकांनीं त्याचा स्वीकार करून त्यास उजेडांत न आणणें त्यांच्या गाजरपारखेपणास उचितच होय. ! वाटेल तितक्या खोगीरभरती कादंबऱ्या, प्रणयप्रायकथा, हीन दीन अमंगळ भावनोत्तेजक गोष्टी, पोकळ देशाभिमान, निर्भेळ पूर्वाभिमान, आणि बहुतेक चांगल्या नवीन सुधारणांची टर, विटंबना, उपहास इत्यादिकांनीं भरलेलीं ऐतिहासिक रूपांतरें; यांची पूर वाहत असून अशा चांगल्या कृतीची दाद लागूं नये हें सखेदाश्चर्य होय. प्रस्तुत लेखकाचा व काणे घराण्याचा अप्रत्यक्ष संबंध होता. तात्या इंदुरास असतांना त्यानें त्यांस पाहिलें होतें, त्यांचा नांवलौकिक त्यानें ऐकिला, आणि खासगी वड्या लोकांच्या मंडळींत तात्यांचीं भाषणें वादविवाद, सार्वजनिक बाबींची चर्चा इत्यादि प्रकारही त्यानें ऐकले होते. त्यावेळीं त्या सर्वांचें यथार्थ स्वरूप जाणण्यासारखी त्यास आकलनशक्ति नसली तरी त्याचा जो ठसा लहानपणीं मनावर उमटला त्याचा जाणत्या वयांत विचारानें अधिकाधिक विकास होऊन, त्यांच्याविषयीं पूज्य भाव वाढत गेला. शिवाय तात्यांच्या तालमींत तयार होऊन पुढें नांवारूपास आलेल्या कांहीं संपन्न लोकांच्या तोंडून त्यांचे गुणवर्णनपर गोष्टी त्यास ऐकण्यास मिळाल्या. बाळाभाऊ यांस इंदूर संस्थानांत स्टेट सर्जनच्या जागीं १८८४ सालीं मोठ्या पगारावर महाराज होळकरसरकारांनीं मोठ्या प्रेमानें बोलाविलें होतें; पण सत्कार्यक्षेत्र मर्यादित होतें म्हणून आभारपूर्वक ती जागा त्यांनीं नाकारिली, हें मला रा. ब. मुळे सी. आय्. इ., यांच्याकडून समजलें होतें. बाळाभाऊ इंदुरास केव्हां केव्हां येत असत. तेव्हां त्यांच्या भेटीचा योग या लेखकास येत असे. समानशील व साहित्यप्रेमी म्हणून गोविंदरावाशीं तर या लेखकाचा विशेष संबंध होता. अशा स्थितींत सदर पुस्तक छापलेलें ऐकतांच त्यास विशेष कौतुक वाटून तें वाचण्याची अत्यंत उत्कंठा वाटली. ती बालामृताच्याद्वारें सुप्रसिद्ध असे रा. डोंगरे यांनीं पुरविली. तेव्हां हा ग्रंथ मराठी-वाङ्मयांत, चरित्रशाखेंत, बऱ्याच वरच्या स्थानीं विराजमान होण्यास योग्य असा वाटला; आणि त्याची फार थोडी माहिती मराठी वाचकांस असावी असें वाटून प्रस्तुतचा हा लेख लिहिला. सध्यां चांगल्या ग्रंथांची पुष्कळदां उपेक्षा होतांना दिसते. तो नजर न पाठविल्यास वृत्तपत्रें, मासिकें वगैरे त्याकडे पाहण्याची व त्याचा उल्लेख करण्याची पर्वा करीत नाहींत, व तें आपलें कर्तव्य नाहीं असें मानतात. कधीं


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

अनुक्रमणिका

कधीं नजर पाठवूनही त्याची नुसती पोंच देण्यापेक्षां जास्त कांहीं एक करीत नाहींत. फार झालें तर "सवडीनें परीक्षण करूं, किंवा मग येईल" हा आशीर्वाद मिळून त्याची सुफलता फार थोड्यांदा झालेली दिसते. ही वस्तुस्थिति १८७४-८२ कालीं निबंधमालाकारांनीं वर्णिली होती, "आणि चांगले ग्रंथ केरांत पडतात आणि पोंचट कादंबऱ्यांच्या अनेकदां पुनरावृत्ति निघतात" म्हणून हाकाटी केली होती. तींत आतांही विशेष बदल झालेला दिसत नाहीं; इतकेंच नाहीं, पण खुद्द निबंधमालेच्या पुनरावृत्ति ज्या निघाल्या, त्याही पण अत्यंत विकृत, विद्रूप, मुळाशीं विसंगत, अशा आकृतींत निघाल्यानें तिच्या खऱ्या बहुमोल गुणांचा बोध होणें दुरापास्त होऊन बसलें आहे. याचें प्रसिद्धीकरण लोभी, अप्पलपोट्या, टाळकुट्या, अंधपोटार्थी, व्यापारी व मारवाडी भक्तांच्या हातीं पडून त्याचें मातेरें झालें. लोकाभिरुचि अत्यंत हीन-भावनाप्रधान झाल्यानें ग्रंथप्रकाशक तसेच बनतात; किंवा पोटाकरितां तसें थोडें फार व्हावेंही लागत असेल. पण संपन्न व सधन ग्रंथप्रकाशक देखील चांगल्या ग्रंथाकरितां पदरास थोडासाही खार लावून घेण्यास धजत नाहींत यापेक्षां दुर्दैव तें कोणतें? चांगल्या ग्रंथांचा खप लौकर होत नाहीं, व जो होतो तोही विशेष लाभकारक नसतो. त्यामुळें खपणारा मालच दुकानदारास हवा, हें खरें. तरी पण लोकाभिरुचीस सुवळण लावणें हें देशहितास अत्यावश्यक होय, हें तत्त्व विशेषतः सधन पुस्तकप्रकाशकांनीं तरी आपलें प्रधान व पवित्र **कर्तव्यकर्म** मानलें पाहिजे, आणि त्याकरितां, थोडी फार झीज सोसून जुने चांगले ग्रंथ नामशेष होऊं देणें अत्यंत अनिष्ट होय. चांगल्या परिक्षकांकडून तपासून घेऊन ते नव्या पिढीच्या समोर आणले पाहिजेत. यासंबंधांत मराठीसाहित्यपरिषदेनेंही त्यांच्याद्वारें हें काम करून घेण्यास उत्तेजन देणें विहित होय. वस्तुतः पाहिलें तर डॉ. काणे यांच्या पेटंट औषधावर संपन्न झालेल्या लोकांनींच हा ग्रंथ छापून प्रसिद्ध करणें त्यांच्या कृतज्ञतेस अनुरूप झालें असतें. तसें न होतां त्यांच्या पुतण्याच्या धर्मपत्नीनें जर तो आतां प्रसिद्ध केला तर आतां तरी त्यांच्या जाहिराती देऊन त्यांचा प्रसार करणें त्यांस कठीण नाहीं. सध्यां जाहिरातींचे दर भयंकर रीतीनीं वाढत जात आहेत. त्यामुळें चांगल्या ग्रंथाचा प्रसार होणें दुर्धर झालें आहे. तशांत प्रकाशक अबलेच्या गैरवाकबीमुळें या चांगल्या कृतीकडे सर्वांचें दुर्लक्ष झालें आहे असें दिसतें. आतां तरी त्याचा आदर होईल अशी आशा करून वाचकांची रजा घेतों.

**वा. ना. देव.**




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

# पुस्तक-परिचय.

**चंद्रचूडदप्तर, गंगोबा तात्यांची कारकीर्द,** किं० तीन रु०. हें पुस्तक पुण्याच्या भारतइतिहाससंशोधकमंडळानें नुकतेंच प्रसिद्ध केलें आहे. गंगाधर यशवंत चंद्रचूड या नांवाचा गृहस्थ होळकरशाहींत सुमारें स० १७५२ पासून पुढें वीस वर्षें प्रमुखपणानें कारभार करीत होता. हे देशस्थ ब्राह्मण पुणें जिल्ह्यांत खेड तालुक्यांत निंबगांव व अन्य ठिकाणीं जोशीपणाची वृत्ति संपादून नांदत होते. पहिल्या बाजीराव पेशव्याचे वेळेस त्या घराण्यापैकीं गंगाधर यशवंत यानें राजकारणांत प्रवेश केला. प्रथम त्यास पेशव्याचे तर्फेनें मल्हारराव होळकराची फडणिशी मिळून, पुढें खासनिसी वगैरे कामें करीत तो होळकराचा दिवाण झाला; आणि वीस वर्षें पावेतों लष्करी व मुलकी अशा दोनही बाबतींचा कारभार त्यानें धूर्ततेनें व निष्ठेनें बजाविला. पुढें दोन तीन पिढ्या हें चंद्रचूड घराणें होळकरांकडे नांदत होते. त्यांच्या घराण्याच्या जुन्या कागदपत्रांचा संग्रह निंबगांवास होता, तो त्या घराण्याचे हल्लींचे वंशज नानासाहेब चंद्रचूड यानीं मंडळास नजर केला, आणि तो सुरक्षित ठेवण्यासाठीं एक दगडी कपाटही आपल्या खर्चानें बांधून दिलें. निंबगांवांस या चंद्रचूडांचा मोठा प्रेक्षणीय वाडा आहे. शेजारींच होळकरांचें मूळ ठिकाण वाफगांव हें असून, तेथें असलेला होळकरांचा वाडा आतां अगदीं पडून गेला आहे. हे दोनही वाडे मराठेशाहीच्या तत्कालीन वैभवाची साक्ष देतात.

या चंद्रचूड दप्तरापैकीं सुमारें दोनशें निवडक कागदांचें हें पुस्तक मंडळानें आपल्या खर्चानें प्रसिद्ध करून पेशवाईच्या इतिहाससाहित्यांत मोठीच भर घातली आहे. सर्व दप्तरांत सुमारें तीस हजार कागद असून ते अजून वाचून लावलेले नाहींत. अर्थात् प्रसिद्ध केलेले हे दोनशें कागद सर्व दप्तर चाळून निवडलेले नसून, सहजगत्या जुने व महत्त्वाचे दिसले तसे घेतलेले आहेत. त्यांपैकीं बरेचसे कागद पानपतच्या प्रसंगापूर्वींचे असून, बाकीचे थोरल्या माधवरावांच्या कारकीर्दीचे आहेत. अर्थात् या कागदांनीं स. १७५२ पासून १७७३ पर्यंतच्या अनेक उलाढालींचे तपशील उलगडण्यास बरीच मदत होईल.

प्रसिद्ध झालेले कागद वाचून पाहतां, खऱ्या ऐतिहासिक महत्वाचे कागद त्यांत थोडेसे आहेत. वास्तविक सर्व दप्तराची चालना होईल तेव्हांच त्यांचें खरें महत्व कळणार आहे. "राजश्री सुभदारांची ( म्ह० मल्हारराव होळकरांची ) प्रकृत, नादीं लागोन, हर एक मजकूर बोलावा तेव्हां पाल्हाळ उदंड बोलतात, त्याजवर न जावें " ( ले० १५०. ) या वाक्यावरून मल्हाररावाचा धरसोडीचा स्वभाव व्यक्त होतो, आणि सामान्यतः बोलल्याप्रमाणें वर्तन करीलच असा त्याजबद्दल लोकांस भरंवसा नसे. माधवराव पेशव्याचे वेळच्या कित्येक बाबतींचे तपशील या पुस्तकावरून उपलब्ध होण्याजोगे आहेत. तत्कालीन सामाजिक व आर्थिक व्यवहारही पुष्कळसे विशद होतील असे कागद यांत आहेत. चंद्रचूड घराण्यांतील बाया हुशार व व्यवहारज्ञ होत्या आणि कित्येकांस लिहितांही येत होतें. एकंदरींत आपण


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

समजतों त्याहून त्यावेळीं स्त्रियांचे ठिकाणीं साक्षरता पुष्कळच ज्यास्त होती यांत संशय नाहीं.

मंडळानें आपलें काम प्रस्तुतच्या विरोधी परिस्थितींतही नेटानें चालविलेलें पाहून संतोष वाटतो.

**मालोजी व शहाजी** हें लहानसें चरित्रात्मक पुस्तक रा. खरे शास्त्री यांनीं प्रसिद्ध करून त्यांत मालोजी व शहाजी या दोन भोंसले कुळांतील प्रसिद्ध ऐतिहासिक व्यक्तींची उपलब्ध माहिती संशोधक दृष्टीनें वेंचून एकत्र गोवली आहे. अर्थातच अभ्यासेच्छूंस या पुस्तकाचा फार मोठा उपयोग होईल. स्वराज्य स्थापनेची स्फूर्ति शिवाजीस कशा रीतीनें झाली, हा महत्त्वाचा प्रश्न अद्यापि इतिहासज्ञांस सुटलेला नाहीं. स्वातंत्र्याची ऊर्मि मालोजीच्या अंतःकरणांत प्रथमपासूनच उसळलेली असून ती त्याचा मुलगा शहाजी व कुटुंबांतील इतर मंडळी यांच्या ठिकाणीं त्या क्रान्तिकारक कालांत ज्यास्त बलवान् झाली होती. शहाजीनें स्वराज्यस्थापनेचा उद्योग बहुतेक सिद्धीस नेला होता, परंतु अनेक भानगडींमुळें जें श्रेय त्यास स्वतः संपादितां आलें नाहीं, तें त्यानें आपल्या मुलाकडून सिद्धीस नेलें, असा शास्त्रीबोवांचा मथितार्थ आहे. तो सामान्यतः सर्वांस पटण्याजोगाच आहे.मात्र जिजाबाईचें व शहाजीचें वितुष्ट केवळ वरकरणी असून शिवाजीची बंडखोरी शहाजीनें मुद्दाम आपला हेतु सिद्धीस नेण्यासाठीं बाहेर पसरिली होती, ही गोष्ट हल्लींच्या पुराव्यावरून निर्विवाद सिद्ध होणारी नाहीं. दुसरा एक महत्त्वाचा मुद्दा या पुस्तकांत पुढें आलेला आहे, तो शिवाजीच्या जन्ममितीचा होय. शके १५४९ ची वैशाख शु॥ ५ ( ता. एप्रिल स-१६२७) ही शिवाजीची जन्मतिथि हल्लीं समजली जाते, ती चूक असून, शके १६५१ फाल्गुन वद्य ३ (मार्च१६३०) ही त्याच्या जन्माची वेळा ज्यास्त भरंवसेलायक समजावी, असा हल्लीं संशोधकांचा कल आहे. आमची सर्व इतिहासभक्तांस अशी विनंती आहे कीं शिवछत्रपतीचा जन्मकाळ त्यांनीं असा अनिश्चित ठेवूं नये. निदान ज्योतिषशास्त्राचें बिनतोड साह्य घेऊन तज्ज्ञांनीं हा काळ एकंदर पुराव्याच्या आधारानें एकवार पूर्णपणें सिद्ध करून घ्यावा. ह्या जन्मकाळावर मोठमोठे उत्सव व समारंभ होत असतात, तेव्हां त्यासंबंधानें समाजाची द्विधावृत्ति असणें श्लाध्य नाहीं. असो. शास्त्रीबुवांचें हें लहानसें संशोधनपुस्तक प्रत्येक इतिहासभक्तानें अवश्य संग्रहीं ठेविलें पाहिजे.

पटवर्धनी दप्तरांतील **ऐतिहासिक लेखांचा दहावा खंड** ही शास्त्रीबुवांनीं नुकताच प्रसिद्ध केला असून, तो त्यांच्या कामाची चिकाटी चांगलीच व्यक्त करितो. आश्रयाभावामुळें हें त्यांचें काम रेंगाळत चाललें आहे, हें महाराष्ट्रास शोभत नाहीं. वास्तविक पटवर्धनी दप्तरासारखीं आणखी किती तरी दप्तरें छापावयाचीं आहेत, आणि किती तरी अद्यापि उपलब्ध व्हावयाचीं आहेत. राष्ट्रीय इतिहास सर्वांगपूर्ण करण्यास विद्वान् लेखकांनीं व धनिकांनीं सारखाच हातभार लाविला पाहिजे.




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

अनुक्रमणिका

# पोंच व अभिप्राय.

**१. खलीफत**—आंग्ल कादंबरीकार डा. जॉन नील यांच्या " Fall of Constantinople " या कादंबरीचें हें भाषांतर रा. भिकाजी गोपाळ भिडे यांनीं केलें असून आपल्या 'सरस वाङ्मय-रत्नमाले'चें २९वें पुस्तक म्हणून तें रा. तात्या ने. पांगळ यांनीं प्रसिद्ध केलें आहे. रोमन साम्राज्य नामशेष होऊन त्याऐवजी खलीफांच्या राज्याची कशी स्थापना झाली, ही हकीगत यांत मनोरंजक रीतीनें सांगितली आहे.

**२. विविध-लेखसंग्रह**—माध्यंदिन ब्राह्मणसमाजांतील सुशिक्षित स्त्रीपुरुषवर्गानें लिहिलेल्या २८ गद्यपद्यमय लेखांचा यांत समावेश झाला आहे. यांपैकीं चार निबंध व एक कविता इंग्रजींत असून अठरा निबंध आणि पांच कविता मराठी आहेत. आरंभींच महाराष्ट्र-वाङ्मय-भक्तांस प्रिय असलेल्या कै. गंगाधरपंत मोगऱ्यांची " मराठी ग्रंथकारांस प्रार्थना" ही प्रोत्साहक कविता असून, नंतर माध्यंदिन ब्राह्मणसमाजांतील पुढारी डॉ. पुरंदरे, वकील रा. शिंगणे वगैरे विद्वान् लोकांचे उपयुक्त लेख आहेत. स्त्रियांनीं लिहिलेले सात गद्यपद्य लेख पाहून या समाजांत स्त्रीशिक्षणाचें पाऊल बरेंच पुढें पडलेलें दिसतें. माध्यंदिन समाजास भूषणभूत असलेले रा. ब. पुरुषोत्तम बाळकृष्ण जोशी यांचा गद्य अगर पद्य लेख यांत झळकत नाहीं, हीच एक या पुस्तकांत उणीव दिसते. किं. १ रुपया. प्रकाशक रा. श्रीपाद ग. आचार्य, सदानंद बिल्डिंग, गिरगांव मुंबई.

**३. मननामोद**:—(प्रथम करंडक). लेखक व प्रकाशक रा. माधव गोविंद भिडे, ६९५ सदाशिव पेठ, पुणें. किं. १ रुपया. ह. भ. प. पांगारकर बुवांचे भिडे हे शिष्य; परंतु या पुस्तकास 'परिचय' म्हणून आरंभीं बुवांनीं जो लेख लिहिला आहे त्यांत त्यांनीं 'अपूर्व कल्पकता व सुरस दृष्टांत' या बाबतींत गुरूवर शिष्यानें ताण केल्याचें कबूल केलें आहे. सांसारिकास यांतील सुभाषितें आनंद देतील.

**४. आत्मानुसंधान**.—हा वेदान्तविषयाचें सुरुभ विवेचन करणारा ग्रंथ रा. परशुराम गोविंद चिंचाळकर ऊर्फ " गोविंदसुत " यांनीं रचिला यांचा पहिला ग्रंथ " परमार्थविचारमाला " आणि दुसरा " रहस्यनिरीक्षण, " यांचा विस्ताराच्या वाचकांस यापूर्वींच परिचय झालेला आहे. प्रकाशकानें म्हटल्याप्रमाणें, दासबोध आणि ज्ञानेश्वरी यांतील उताऱ्यांनीं हा ग्रंथ खचून भरलेला आहे. परंतु त्यामुळें प्राकृत जनांस यांतील विवेचन समजणें जास्त सुलभ होईल. मुमुक्षूंनीं या ग्रंथाचा अवश्य संग्रह करून त्यांतील विचारांचें मनन करावें. किं. २ रुपये; पृ. डेमी अष्टपेजी २५०; प्रकाशक रा. दत्तात्रेय प. चिंचाळकर, वकील, अमळनेर, जि. खानदेश.

**५. स्वानुभवतरंग** अथवा **वेदान्तशास्त्र-काव्य**. नासिक-पंचवटीनिवासी श्रीमत् अद्वैतेंद्रसरस्वती (घोलपस्वामी) यांनीं तत्त्वज्ञान, आरोग्य, भक्ति, नीति इत्यादि विषयांवर स्वानुभवानें संस्कृत भाषेंत जी ग्रंथरचना केली, ती या २२४ पृष्ठांच्या पुस्तकांत, मराठी भाषांतरासह, रा. गणेश रा. भोपटकर यांनीं प्रकाशित केली आहे. शिवाय २६ पृष्ठांत श्रीकपिलेश्वराची कथा आणि नासिकपंचवटींतील देवतांचीं स्तोत्रें दिलीं असून, आरंभींच्या २४ पृष्ठांत घोलप स्वामींच्या आणि त्यांच्या मतांचा परिचय करून दिला आहे. हा ग्रंथ मुमुक्षूंस उपयुक्त वाटेल. याची किं. १। रु. असून माफक असून, तो नासिक येथील कापडाचे व्यापारी रा. रामचंद्र दादाजी गोऱ्हे यांचेकडे मिळेल.

**६. रवीचे उज्ज्वल किरण**.—रा. वासुदेव गोविंद आपटे, बी. ए., आनंदकर्ते, यांनीं सुरू केलेल्या 'सत्साहित्य-पुस्तकमाले'चें हें प्रथम पुष्प असून, त्यांत कविसम्राट् रवींद्रनाथ टागोर यांच्या १० रहस्यमय आणि बोधप्रद गोष्टी दिल्या आहेत. रा. आपट्यांनीं आरंभीं या दहाही गोष्टींचें सार दिलें असल्यानें वाचकांस त्यांतील गूढ उकलण्यास कठीण जाणार नाहीं. पहिलीच जी पोपटाची कहाणी दिली आहे, तींत प्रस्तुतची सरकारी शिक्षणपद्धति आणि सरकारचें शिक्षणप्रसारासंबंधाचें धोरण यांविषयीं सूचक टीका आहे. 'तम्हीच आमचे राजे' या विनोदपर गोष्टींत पाश्चात्यांचें अंध अनुकरण करणारांवर उघड उघड कटाक्ष आहे. पुस्तक बोधप्रद आणि मनोरंजक असल्यामुळें मुलांच्या हातांत देण्यास सर्वथा पात्र आहे. किं. १२ आणे थोडी जास्त आहे; परंतु हल्लींच्या महागाईच्या काळांत बहुधा ती क्षम्य भासेल.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत